अखिलभारतीय–प्राच्यविद्यासम्मेलनम्
शतवर्षमहोत्सवग्रन्थमाला – ७४

# नाग नगरीतील संस्कृत साहित्य
## (२००१ – २०१९)

डॉ. सौ. अबोली व्यास

प्रधानसंपादकः
आचार्यः श्रीनिवासः वरखेडी
कुलगुरु

संपादकः
आचार्यः मधुसूदनः पेन्ना
संचालकः संशोधन–प्रकाशनविभागः




कविकुलगुरु–कालिदास–संस्कृत–विश्वविद्यालयः
रामटेकम्, जि. नागपुरम् (महाराष्ट्रम्)



2020

अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ७४

# नाग नगरीतील संस्कृत साहित्य
## (२००१ – २०१९)

**डॉ. सौ. अबोली व्यास**

प्रधानसंपादक
आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु

संपादक
आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)
२०२०

| | | |
|---|---|---|
| शीर्षक | – | नाग नगरीतील संस्कृत साहित्य<br>(२००१ – २०१९) |
| लेखक | – | डॉ. सौ. अबोली व्यास |
| प्रधानसंपादक | – | आचार्य श्रीनिवास वरखेडी<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| संपादक | – | आचार्य मधुसूदन पेन्ना<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन | – | प्रो. गौतम पटेल, अध्यक्ष<br>प्रो. सरोजा भाटे, सचिव<br>प्रो. ग. उ. थिटे, उपाध्यक्ष |
| संपादक मंडळ | – | डॉ. दिनकर मराठे, क.का.सं.वि., रामटेक<br>डॉ. वीणा गानु, नागपुर. |
| प्रकाशन वर्ष | – | २०२० |
| आवृत्ती | – | प्रथम |
| मूल्य | – | रू. १९८/– |
| आय.एस.बी.एन. | – | 978-93-85710-28-5 |
| मुखपृष्ठ | – | श्री. उमेश पाटील |
| मुद्रक | – | अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टींग, नागपूर. |
| प्रकाशक | – | कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक<br>प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक. |



## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

सरस्वती श्रुतिमहती महीयताम्

Ramtek
10th January 2020

Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

**Kavikulaguru Kalidas Sanskrit University**
**All India Oriental Conference**

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

**Chief Patron**
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

**Patron**
Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

**AIOC President**
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

**AIOC General Secretary**
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

**AIOC Local Secretary**
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

**Additional Local Secretary**
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

**Organising Committee**
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek
Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Srinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# मनोगत

डॉ. अबोली रजनीश व्यास यांचे 'नाग नगरीतील संस्कृत साहित्य' हे पुस्तक वाचकांच्या हाती पोहचते आहे ही अत्यंत आनंददायी बाब आहे. या पुस्तकाच्या निर्मितीसाठी डॉ. अबोली व्यास ह्यांचे हार्दिक अभिनंदन.

डॉ. बोली व्यास ह्या विद्यार्थी दशेपासून एक हुशार विद्यार्थीनी म्हणून परिचित आहेत. जिज्ञासू वृत्ती धडपडा स्वभाव, परिश्रमशीलता आणि सकारात्मक विचारसरणी हे त्यांच्या व्यक्तीमत्वाचे खास विशेष. त्यामुळेच गृहास्थाश्रमातील जबाबदाऱ्या यशस्वीपणे सांभाळीत त्यांनी बी.ए., एम्.ए., एम्.फिल्., पीएच्.डी. हा शैक्षणिक सोपान पार केला. एम्. फिल्. च्या अभ्यासक्रमाचे वेळी त्यांनी 'नागपूरचे गतदशकात संस्कृत साहित्याला योगदान (२००२ ते २०१२)' या विषययावर लिहिलेला लघुशोधप्रबंध अधिक विकसित करून या पुस्तकाच्या रूपाने आकारास आणला आहे.

नागपूर हे भारतवर्षाच्या मध्यभागी असलेले एक वैशिष्ट्यपूर्ण, सुंदर, सुरक्षित आणि शांत असे शहर. ही नागनगरी विविध कार्यक्षेत्रांमध्ये अग्रेसर आहे याचा आम्हा नागपूरकरांना सार्थ अभिमान आहे. संस्कृतच्या क्षेत्रात देखील आमची ही संत्रानगरी अग्रेसर आहे. नागपूरात चालणारे संस्कृतचे कार्य १) वेदविद्येचे जतन आणि संवर्धन, २) संस्कृत मूलक संशोधन, ३) संस्कृत साहित्य निर्मिती, ४) शालेय आणि महाविद्यालयीन स्तरावर संस्कृतचे अध्ययन आणि अध्यापन आणि ५) संस्कृतचा प्रचार आणि प्रसार असे पंचधा आहेत. हे प्रत्येकच कार्य स्वतंत्र अध्ययनाचा विषय आहे. त्यापैकी डॉ. अबोली ह्यांनी नागपुरातील संस्कृत साहित्य निर्मितीवर आपले लक्ष केंद्रित केले आणि त्या कार्याचा विस्तार आणि पूर्वपिठिला लक्षात घेऊन केवळ २००१ ते २०१९ या काळातील म्हणजे केवळ २१व्या शतकातील नागपूरातील संस्कृत साहित्य अध्ययनासाठी निवडले. या कालावधीत नागपुरातील प्रतिभासंपन्न कविजनांनी केलेल्या संस्कृत वाग्देवतेच्या सेवेचे समग्र अध्ययन करण्याचा प्रयत्न लेखिकेने केला आहे. या साहित्यात महाकाव्ये, लघुकाव्ये, कथासाहित्य, बालसाहित्य, नाट्यरचना, स्फुटकाव्ये आणि

अनुवादित साहित्य या सर्वांचा अंतर्भाव आहे. म्हणूनच लेखिकेने ग्रंथाच्या प्रस्तावनेत आपली भूमिका, अध्ययनाची पूर्वपिठिका, अध्ययनाची मर्यादा आणि व्याप्ती या सर्व बाबी स्पष्ट करून महाकाव्ये, लघुकाव्ये-स्फुटरचना, नाट्यसाहित्य, कथासाहित्य, बालसाहित्य, अनुदित साहित्य आणि उपसंहार अशा ८ प्रकरणांमध्ये ग्रंथाची रचना केली आहे. या प्रत्येक प्रकरणामध्ये त्या-त्या वर्गवारीतील संस्कृत रचनेचा परिचय लेखिकेने दिला आहे. काही रचनांचा परिचय सविस्तर तर काही रचनांचा परिचय थोडक्यात दिला आहे हे प्रकर्षाने जाणवते. प्रत्येक रचनेचे रचनाकार, प्रकाशक, प्रकाशन वर्ष आणि त्या रचनेचे बाह्य स्वरूप लेखिकेने नमूद केले आहे. प्रायः २००१ ते २०१९ या काळात नागनगरीत निर्माण झालेली कोणतीही संस्कृत रचना लेखिकेच्या लेखणीतून सुटली नसावी असे वाटते. शेवटच्या उपसंहार या प्रकरणात लेखिकेने स्वतःची निष्कर्षात्मक मते स्पष्टपणे मांडलेली आहेत. लेखिकेची भाषा साधी, सरळ आणि ओघवती आहे. हे पुस्तक वाचल्यानंतर नागपुरातील संस्कृत रचनाकारांचे संस्कृत साहित्याला लाभलेले मौलिक योगदान प्रकर्षाने जाणवते. अर्वाचीन संस्कृत साहित्याचे अध्ययन करू इच्छिणाऱ्या किंवा त्या सम्बधी जाणून घेण्यास उत्सुक असलेल्या संस्कृतानुरागींसाठी हे पुस्तक म्हणजे एक पथप्रदर्शक दीपस्तंभ आहे, यात शंका नाही. या मौलिक कार्यासाठी डॉ.अबोली व्यास आणि या ग्रंथाचे प्रकाशक यांचे मनःपूर्वक अभिनंदन.

डॉ. अबोली व्यास यांनी आपले अध्ययन सातत्याने सुरू ठेऊन अभ्यासपूर्ण ग्रंथांची निर्मिती करावी ही सदिच्छा आणि त्यासाठी परमेश्वराने त्यांना प्रेरणा, शक्ती आणि अनुकूलता प्रदान करावी ही ईश्वरचरणी प्रार्थना.

**-डॉ. शारदा रमेश गाडगे**
निवृत्त विभागाध्यक्षा
एल.ए.डी. महाविद्यालय,
नागपूर.

# ऋणनिर्देश

नाग नगरीतील संस्कृतसाहित्य हे माझे पुस्तक आज प्रकाशित होत आहे ह्याचा मला अतिशय आनंद होत आहे. माझे हे पुस्तक म्हणजे मी कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाच्या एम्.फिल्. अभ्यासक्रमासाठी लिहिलेला लघुशोध प्रबंध आहे. या विषयावर पुस्तक तयार करताना मला अनेक ऋणानुबंधींनी सहकार्य केले. त्यांच्या प्रति ऋणनिर्देश करणे हे माझे आद्य कर्तव्य आहे. हे पुस्तक लिहिण्याच्या संकल्प करण्याच्या पातळीवर मला नेऊन ठेवणाऱ्या व्यक्तींची मी सदैव ऋणी राहीन.

माझ्या पाठीशी सदैव खंबीरपणे उभे असणारे माझे सासू-सासरे ॲड. रत्नाकर व्यास आणि सौ. रजनी व्यास तसेच माझे आई वडील श्री. अनिल सावदेकर आणि सौ. अनघा सावदेकर ह्यांच्या ऋणातून मुक्त होणे मला शक्य नाही. त्याचप्रमाणे माझे पती ॲड. रजनीश व्यास ह्यांचीही मी ऋणी आहे. त्यांच्याच प्रोत्साहनाचे फळ म्हणजे हे पुस्तक. त्यांच्या प्रोत्साहनाशिवाय हे कार्य पूर्णत्वाला जावू शकले नसते. अभ्यास करतेवेळी निमुटपणे बाजूला बसणारे आणि कौतुकाने आपल्या आईकडे पाहणारे माझे दोन मुलं कु. मैथिली आणि चि. कौटिल्य ह्यांचे मला मनापासून कौतुक वाटते. त्यांनी शांत बसून मला सहकार्य केले त्यामुळे या दोन चिमुकल्यांचा मला येथे आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. माझ्या संस्कृत अध्ययनाचे प्रेरणास्थान असलेल्या डॉ.शारदा गाडगे ह्यांचे मला मौलिक मार्गदर्शन लाभले. त्यांनी आपला अमूल्य वेळ मला दिला आणि अध्ययनाची योग्य दिशा दाखविली, त्यांच्या प्रति मी कृतज्ञ आहे. त्यांच्या सहकार्याशिवाय हे पुस्तक लेखन पूर्णतः अशक्य होते. कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचे समस्त आदरणीय गुरुजन आणि विशेष करून डॉ. मधुसूदन पेन्ना ह्यांनी मला अत्यंत सहकार्य केले. यांच्या प्रती मी मनापासून कृतज्ञता व्यक्त करते. डॉ. लीना रस्तोगी, डॉ. हंसश्री मराठे, श्रीमती दुर्गाताई पारखी, डॉ. वीणा गानु ह्यांनी मला वेळोवेळी अत्यंत सहकार्य केले त्याबद्दल मी त्यांची ऋणी आहे.

संपदा क्रिएशन्सने सुबकतेने संगणकीय अक्षर जुळवणी कार्य केले तसेच ह्या पुस्तकाचे प्रकाशक आणि माझे हितचिंतक ज्ञान-अज्ञात अशा अनेकांनी मला सहकार्य केले त्यांचे मनःपूर्वक आभार मानते.

नित्य वंदनीय सद्गुरुंच्या चरणकमलांवर प्रस्तुत पुस्तक सादर समर्पित !

**- डॉ. सौ. अबोली व्यास**

# अनुक्रमणिका



### प्रकरण पहिले

# प्रस्तावना

विद्यमान विश्व हे परमेश्वराचे सृजन आहे. सर्वशक्तिमान परमेश्वराने सृष्टीची निर्मिती करीत असतांना अतिशय परिश्रम केले. विविध प्रकारचे पशु, पक्षी, वनस्पती अशी सारी सजीव सृष्टी आणि पर्वत, नद्या निर्झर, जलाशय अशी सारी निर्जीव सृष्टी त्या जगन्नियन्त्या विधात्याची कृती आहे.

मनुष्यप्राण्याची निर्मिती करीत असताना या पुराणपुरुषाने विशेष खबरदारी घेतलेली दिसते. मानवाला लाभलेल्या सर्व प्रभावी शक्तिपैकी भाषणशक्ती आणि श्रवणशक्ती या दोन शक्ती भाषानिर्मितीचे मूळ कारण आहेत.

श्री. भोलानाथ तिवारी यांच्या मते परस्पर व्यवहाराच्या गरजेतून भाषा निर्माण झाली कारण भाषा हे विचारांच्या आदानप्रदानाचे आणि परस्पर व्यवहाराचे प्रभावी साधन आहे. आज आपल्याला जगात असंख्य भाषा अस्तित्वात असलेल्या आढळतात. त्यांची गणना करणे दुरापास्त आहे. आपल्या एकट्या भारत देशामध्ये अनेक भाषा बोलल्या जातात.

अतिप्राचीन भारतामध्ये अगदी वेदकाळापासून संस्कृत बोली भाषा होती. तत्कालीन समाजातील सर्वच लोक आपल्या व्यवहारासाठी संस्कृत भाषेचा उपयोग करीत असत, असे काही अभ्यासकांचे मत आहे.

श्री. वाचस्पती गैरोला यांनी या विषयी आपले ठाम मत मांडले आहे. त्यांच्या मतानुसार संस्कृत भाषेला स्वतःच्या वैभवकाळात राष्ट्रभाषेचा मान प्राप्त झाला होता. यास्काचार्यांपासून म्हणजे सुमारे इ.स. पूर्व ७०० पासून महामुनी पतंजलीपर्यंत म्हणजे सुमारे इ.स.पूर्व २०० पर्यंत संस्कृत बोली भाषा होती.

पाणिनींच्या अष्टाध्यायीत 'संस्कृतम्' ४/४/३ आणि 'संस्कृतम् भक्षाः' ४/२/१६ या सूत्रांमध्ये संस्कृत हा शब्द आला आहे. 'संस्कृत' म्हणजे शुद्ध केलेले, स्वच्छ केलेले असा अर्थ होतो. म्हणजे संस्कृत ही भाषा शुद्ध स्वरूपातील भाषा आहे.

भारतीय संस्कृतीचा कळस ज्या भक्कम पायावर उभा आहे तो पाया किंवा आधार असलेले आपले वेद-वाङ्मय, भारतीयांच्या असीम श्रद्धेचे निधान असलेले रामायण, महाभारत आणि पुराण वाङ्मय संस्कृत भाषेत लिहिल्या गेले. म्हणूनच 'संस्कृत संस्कृतेर्मूलम्' असा गौरव संस्कृत भाषेला प्राप्त झाला. या सर्व धार्मिक साहित्यानंतर निर्माण झाले ते अभिजात संस्कृत साहित्य. भास, कालिदास, अश्वघोष, शूद्रक, भवभूती, भर्तृहरी, विशाखदत्त, भारवी, बाणभट्ट, दण्डी, सुबन्धु, श्रीहर्ष, माघ, जगन्नाथ पण्डित या सर्व कवींनी अविरत परिश्रम करून आजन्म संस्कृत सरस्वतीची सेवा केली. आपल्या मौल्यवान काव्यरत्नांनी तिचा गाभारा परिपूर्ण केला. या गाभाऱ्यामध्ये विविध प्रकारची काव्यरत्ने होती. नाटके, महाकाव्ये, लघुकाव्ये, गीतिकाव्ये, गद्यकाव्ये, लघुकथा, स्फुटकाव्ये, लालित्यपूर्ण स्तोत्रे असे वैविध्य असलेले संस्कृत साहित्य हा आपल्या शिरोधार्य संस्कृतीचा अनमोल वारसा आहे. या सर्वच काव्यांचे रसिकहृदयहारित्व आज हजारो वर्षानंतरही यत्किंचितही कमी झालेले नाही. यातील काही काव्यांचे केवळ अन्य भाषांमधील अनुवाद वाचून रसिकवाचक आनंदाने बेभान झाले. गटे नावाचा एक जर्मन पण्डित कालिदासांच्या 'अभिज्ञानशाकुन्तलम्' या नाटकाचा जर्मन अनुवाद वाचून आनंदाने नाचला होता. तर मग मूळ काव्याचा आनंद काय वर्णावा?

अभिजात संस्कृत साहित्याच्या वर्णनातीत रसास्वादात रसिक मण्डळी न्हाऊन निघत असतांनाच दुसरीकडे संस्कृत भाषा शास्त्रीय ग्रंथामधूनही विकसित होत होती असे दिसते. आयुर्वेद खगोलशास्त्र, गणितशास्त्र, रसायनशास्त्र, स्थापत्यशास्त्र, संगीतशास्त्र, व्याकरणशास्त्र, अर्थशास्त्र, छंदशास्त्र, साहित्यशास्त्र अशा विविध शास्त्रांवरील मौलिक ग्रंथही संस्कृत भाषेमध्ये निर्माण झाले. त्यापैकी अनेक ग्रंथ आजही अभ्यासासाठी उपलब्ध आहेत. हे सर्व ग्रंथ अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

संस्कृत साहित्याचा अनेक दृष्टीकोनातून अभ्यास करण्यात येतो. संस्कृत साहित्याचे प्रत्येक वैशिष्ट्य रसिकांना आनंद देणारे, आकर्षित करणारे, अभ्यासकांना प्रेरित करणारे असे आहे. संस्कृत साहित्यातील रस, पात्रे, त्यांचे स्वभावविशेष,भाषा, तत्कालीन शिष्टाचार प्रत्येक कवीची जीवनविषयक दृष्टी, साहित्यशास्त्रीय दृष्टीने त्या काव्याचे मूल्यमापन या सर्व गोष्टी वैशिष्ट्यपूर्ण आणि म्हणून अभ्यसनीय आहेत. तर शास्त्रीय ग्रंथ शास्त्रीय ज्ञान प्राप्त करण्यासाठी उत्सुक असलेल्या जिज्ञासूंच्या अभ्यासाचे विषय आहेत. एवढेच नव्हे तर लहान मुलांसाठी पंचतंत्र, नीतिशतकम् यांसारखे पुस्तकेही संस्कृतात उपलब्ध आहेत.



संस्कृत भाषेचा विविध अंगांनी अभ्यास आजपर्यंत बराच झाला आहे, आजही होतो आहे. अगदी आपल्या नागपूरातही हे कार्य अविरत सुरुच आहे. संस्कृत साहित्य निर्मितीच्या कार्यामध्ये नागपूर कधीही मागे पडलेले नाही. नागपूरच्या ह्या संस्कृत सेवेचा इतिहास मनोज्ञ आहे. प्रज्ञाभारती डॉ. श्री.भा. वर्णेकर यांनी त्यांच्या 'अर्वाचीन संस्कृत साहित्य' या ग्रंथामध्ये १९६० सालापर्यंतच्या संस्कृत साहित्याचा उल्लेख केला आहे. डॉ. प्रभाकर आग्रे यांनी त्यांच्या 'विदर्भ प्रदर्शनाने संस्कृत साहित्यात घातलेली भर' मंगेश प्रकाशन २००२ ह्या ग्रंथात विदर्भ प्रदेशातील संस्कृत साहित्याची माहिती संकलित केलेली आहे. त्याचप्रमाणे डॉ. हंसश्री मराठे यांनी त्यांच्या ''ललित संस्कृत साहित्याला महाराष्ट्राचे योगदान'' ह्या ग्रंथामध्ये १९९९ पर्यंतचा महाराष्ट्राचा संस्कृत साहित्येतिहास दिलेला आहे. ह्या नंतरच्या काळात देखील संस्कृत साहित्य निर्मितीचे हे कार्य अविरत सुरु आहे. नागपूरात निर्माण झालेल्या ह्या संपूर्ण संस्कृत साहित्याचा अभ्यास करणे हे अत्यंत विस्तृत कार्य आहे. म्हणून २१व्या शतकाच्या सुरुवातीपासून म्हणजेच इ.स. २००१ ते इ.स. २०१९ ह्या कालावधीत निर्माण झालेल्या संस्कृत साहित्याचे अध्ययन करण्याचे ठरविले व त्यानुसार केवळ वरील १८ वर्षात नागपूरात निर्माण झालेल्या आणि प्रकाशित झालेल्या संस्कृत साहित्याचा अंतर्भाव प्रस्तुत पुस्तकात करण्यात आला आहे.

नागपूरात निर्माण झालेले हे संस्कृत साहित्य विविधांगी आहे. त्यात महाकाव्ये, लघुकाव्ये, कथासाहित्य, नाट्यकृति, बालसाहित्य आणि अनुवादित साहित्य ह्या सर्व काव्यप्रकारांचा अंतर्भाव आहे.

**महाकाव्ये**

१) राधायनम्
२) काव्यकण्ठचरितम्
३) प्रज्ञाचक्षुषम्

**लघुकाव्ये स्फुटरचना**

१) काव्यमधुपर्क
२) कूजनम्
३) आवेदनम्
४) नरमेधः

५) प्रहेलिका शतकम्
६) संस्कृतगङ्गाधारा
७) संस्कृत अंत्याक्षरी मञ्जूषा
८) संस्कृत काव्यतरङ्गिणी
९) श्री गणेश वंदना

**नाटके (रूपके)**

१) काव्यकण्ठोविजयते
२) तमसो मा ज्योतिर्गमय
३) रसाविष्कारः
४) नाट्यत्रिदलम्

**कथासाहित्य**

१) कथामृतम्
२) कथासुमनस्सौरभम्
३) कथारत्नावली
४) कथापाथेयम्
५) कथापुष्पावली
६) नवकथाः
७) शारदीयम्
८) जागरा
९) मुष्ट्यामेव एव अस्ति अमरत्वम्

**बालसाहित्य**

१) देवमानवः
२) स्वातन्त्रवीराः
३) राजकीय महापुरुष : भाग १
४) महर्षिवर्याः
५) त्यागधनाः
६) समाजोद्धारकाः
७) आध्यात्मिक महापुरुषाः





८) सत्पुरुषाः
९) राजवर्याः
१०) बालरत्नानि
११) शिक्षणमहर्षयः
१२) योगिवर्याः
१३) विशिष्ट महिलाः
१४) महाकवयः
१५) प्रसिद्धाः वैज्ञानिकाः
१६) वणिग्वराः
१७) कलाविदः
१८) शास्त्रवर्याः
१९) राजकीय महापुरुषाः
२०) आधुनिक राजकीय नेतार भाग १
२१) चिरज्जीविनः
२२) क्रीडानिपुणाः
२३) आधुनिक राजकीय नेतारः भाग २
२४) बालकथातरंङ्गिणी
२५) बालकथापुष्पहारः
२६) रम्या रामायणी कथा
२७) संस्कृत बालनाट्यसंवाद मञ्जूषा
२८) बालनाट्यवल्लरी
२९) परिव्राजकत्रयम्

**अनुवादीत साहित्य**

कथासंग्रह

१) जालकिरणाः
२) जगदा

**कादंबरी**

१) शामस्य माता
२) अभिशप्तम् पुष्पम्

**चरित्रग्रंथ**

१) गुलाबरावमहाराजचरितम्

**नाट्यकृती**

१) रसरङ्ग

**चरित्रग्रंथ**

१) स्वयंसिद्धः प्रज्ञाचक्षुः श्रीगुलाबरावमहाराजः

२) परिव्राजकत्रयम्

वरील सर्व काव्यकृतींचा संक्षिप्त परिचय आणि त्यांचे थोडक्यात संमिक्षण करण्याचा प्रयत्न येथे केलेला आहे. अनावधानाने एखादे काव्य माझ्या अध्ययनातून सुटण्याची शक्यता नाकारता येत नाही त्याबद्दल क्षमाप्रार्थी आहे.

**संदर्भग्रंथ सूची**

१) संस्कृत साहित्यातील सुभाषितांचे चिकित्सक अध्ययन. पेज नं. १,२.
२) संस्कृत साहित्यातील सुभाषितांचे चिकित्सक अध्ययन. पेज नं. १,२.
३) संस्कृत साहित्यातील सुभाषितांचे चिकित्सक अध्ययन. पेज नं. १,२.





**प्रकरण दुसरे**

# महाकाव्य

संस्कृत ही विश्वातील एक प्राचीनतम भाषा प्रदीर्घ कालौघात तिच्या वैशिष्ट्यांसह टिकून राहिली हे विशेष. संस्कृत भाषा आणि साहित्य हा भारतीय संस्कृतीला लाभलेला अनमोल वारसा आहे. ह्याच संस्कृत साहित्याचा महत्त्वाचा भाग म्हणजे महाकाव्ये.

महाकाव्याची लक्षणे खालीलप्रमाणे सांगितलेली आहेत. 'महाकाव्याच्या सुरुवातीत मंगल असावे, महाकाव्यात सर्ग नावाचे विभाग असावेत, सर्ग सामान्यतः एकाच वृत्तात असावा, प्रत्येक सर्गात श्लोक संख्या ३० हून कमी व २०० हून जास्त नसावी. सर्गांतील भिन्न वृत्तात श्लोक असावेत आणि त्यात पुढील सर्गाची सूचना असावी. एकूण सर्ग संख्या आठाहून कमी व ३० हून जास्त नसावी. त्यामधून, सूर्य, चंद्र, सकाळ, सायंकाळ, दुपार, दिवस, रात्र, अंधकार, प्रदोष, मृगया, पर्वत, नद्या, अरण्ये, ऋतु, समुद्र, युद्ध, सैन्य, विवाह, प्रणयक्रिडा, पुत्रजन्म, मंत्र, नगरे, स्वर्ग, भूमी वगैरे गोष्टींची वर्णने यावीत, कथानक इतिहास प्रसिद्ध असावे. त्यात श्रृंगार, वीर, करुणा ह्यापैकी एक रस प्रमुख असावा. श्रृंगारात विप्रलंभ व संभोग असेही दोन्ही प्रकार असावेत, काव्याचे नाव प्रमुख घटनांवरून देण्यात यावे. धर्माचा विजय आणि अधर्माचा पराजय हे ह्याचे अंतिम उद्दिष्ट असावे.

संस्कृत साहित्याचा हा वारसा आजवरही टिकून राहिला आहे. ह्या वारस्याला टिकवून ठेवण्यात नागपूरातील अनेक विद्वानांचा हातभार आहे. नागपूरात गेल्या १८ वर्षात खालील महाकाव्ये निर्माण झाली.

| | |
|---|---|
| १) राधायनम् | सौ. ललिताशास्त्री विनायक आर्वीकर |
| २) काव्यकण्ठचरितम् | डॉ. मधुसूदन पेन्ना |
| ३) प्रज्ञानक्षुषम् | डॉ. मधुसूदन पेन्ना |

सौ. ललिताशास्त्री विनायक आर्वीकर ह्यांनी राधायनम् नावाचे महाकाव्य रचून संस्कृत साहित्य निर्मितीच्या कार्यात आपला महत्त्वाचा वाटा दाखविलेला आहे. 'राधायनम्' या महाकाव्यावर मी एक निबंध लिहिला होता तो निबंध ह्या पुस्तकात अंतर्भूत करण्यात आला आहे.

**राधायनम्** सौ. ललिताशास्त्री आर्वीकर

**कवयित्रीचा परिचय**

राधायनम् हे महाकाव्य सौ. ललिताशास्त्रींनी लिहिले. ह्यांचे पूर्ण नाव सौ. ललिताशास्त्री विनायकराव आर्वीकर असे आहे. ह्यांचा जन्म १९४४ साली औंदुबंर ह्या गावी झाला. त्यांचे शालेय शिक्षण बाबासाहेब धनवटे नगर विद्यालयात झाले. इ.स.१९५९ साली त्या विज्ञान आणि संस्कृतमध्ये प्राविण्य घेवून मॅट्रिक झाल्या. त्यानंतर श्रीमती बिंझाणी महिला महाविद्यालयात त्यांनी पुढील शिक्षणासाठी प्रवेश घेतला. नंतर त्यांनी भोसला संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेवून नागपूर विश्वविद्यालय संस्कृत माध्यमातून असलेली प्रज्ञा परिक्षा द्वितीय क्रमांकांनी उत्तीर्ण केली. बंगाल विश्वविद्यालयाची व्याकरण विषयक असलेली पहिली परिक्षा त्यांनी पहिल्या क्रमांकांनी उत्तीर्ण केली. १९६२ साली नागपूर युनिव्हर्सिटीची विशारद परिक्षा पहिल्या क्रमांकांनी उत्तीर्ण केली. १९६३ साली त्यांनी बी.ए. केलं. त्यात त्या सहाव्या मेरीट होत्या. जी.पी.ओ मध्ये त्या कार्यरत होत्या. त्यानंतर १९६४ साली त्या एम.ए. झाल्या. जर्मन भाषेचं देखील प्रशिक्षण त्यांनी घेतलेलं आहे. १९७२ साली त्यांचा विवाह झाला. त्यानंतरही त्यांनी अनेक ठिकाणी शोधनिबंधाचे वाचन केले. त्यांना दोन मुलगे असून ते दोघेही पौरोहित्य करतात. त्यांना दोन सूना आणि नातवंड देखील आहेत. त्यांच्या घरात एकूणच संस्कृतमय वातावरण आहे.

**महाकाव्याविषयी**

ह्या महाकाव्याला एकूण ३५४ पाने आहेत. ह्या महाकाव्यात एकूण सर्गसंख्या ९ आणि श्लोक संख्या ५२३ आहेत. ह्या महाकाव्यांच्या पान नं.४ वर अनुक्रमणिका दिलेली आहे. तसेच त्याला लागूनच पुढील पानांवर रंगीत चित्रे त्यांच्या गुरुंचे आणि वडिलांचे दिलेले आहेत. कवयित्रीने स्वतःचा परिचय पान नं. ८ ते पान नं. १४ इतका म्हणजेच सात पानी दिलेला आहे. ह्याच्या पृष्ठभागावर अतिशय मोहक असे राधाकृष्णाचे चित्र आहे. मागील भागावर राधेचे बासरी वाजवतानाचे अतिशय सुरेख असे चित्र आहे.



ह्याचे प्रकाशक श्री. विनायकशास्त्री शं. आर्वीकर आहेत. ह्याची प्रथम आवृत्ती फाल्गुन शु. ६ दिनांक २७/०२/२०१२ ला झाली. ह्याची प्रस्तावना डॉ. पंकज चांदे यांनी लिहिलेली आहे.

**महाकाव्याचे कथानक**

**सर्ग पहिला श्रीराधाधिष्ठानम्**

पहिल्या सर्गात कवयित्रीने दुःखित पीडित अशा धेनुरूप पृथ्वीचे वर्णन केले आहे. कवियित्री म्हणते की पापाच्या भाराने ग्रासलेली ती धेनुरूप पृथ्वी आपले दुःख घेवून ब्रह्मदेवाकडे जाते. त्यानंतर ब्रह्मदेव, पृथ्वी ह्यांना विष्णू गोलोकात बसणाऱ्या श्रीकृष्णाला शरण जाण्यास सांगतो व ते सर्व देव गोलोकाकडे प्रस्थान करतात.

कवियित्रीने ह्या सर्गात गोलोकाचे नंतर तेथील नद्या, स्त्रिया ह्यांचे तसेच वृंदावनाचे व तेथील गार्यींचे अतिशय सुंदर वर्णन केले आहे. सर्गाच्या शेवटी सर्व देव अतिशय सुंदर तेजपुंज अशा कमळावर अधिष्ठित सिंहासनावर आरुढ झालेल्या राधाकृष्णासमोर नतमस्तक होतात आणि पहिला सर्ग संपतो.

**सर्ग दुसरा श्रीराधावतार प्रस्तावना**

दुसऱ्या सर्गात कवयित्रीने श्रीकृष्णाचे व राधेचे वर्णन केले आहे.

सर्व देव राधाकृष्णाला नमन करतात आणि ह्या धेनुरूप पृथ्वीच्या संकटांचा तुम्हीच नाश करू शकता असे त्यांना म्हणतात.

ह्या सर्गात राधेचे संपूर्ण वर्णन अतिशय सुंदर रितीने कवियित्रीने केले आहे. हे वर्णन करतांना त्यांनी मीमांसक सांख्यशास्त्रज्ञ ह्यांचा उल्लेख केलेला आहे. राधेला संपूर्ण प्रकृती म्हटलेले आहे.

देवांनी कृष्णाला संकटांचा नाश कर म्हटल्यावर कृष्ण जेव्हा पृथ्वीवर अवतार घेण्यासंबंधी बोलतो तेव्हा राधा त्यावर म्हणते की जर कृष्ण पृथ्वीवर गेला तर माझे पंचप्राण ओठाद्वारे बाहेर येतील, तेव्हा श्रीकृष्ण तिला समजावून तिचे सांत्वन करून तू माझ्या बरोबर पृथ्वीवर येशील असे वचन देतो.

ह्या नंतर ह्या सर्गात राजा सुचंद्र आणि त्याची पत्नी ह्यांचे तप, ब्रह्मदेवाने दिलेला आशीर्वाद हे सगळे आलेले आहे आणि हा सर्ग संपतो.

**सर्ग तिसरा श्रीराधावतार**

ह्या सर्गात कवयित्रीने राधेच्या जन्माचे वर्णन केलेले आहे. राधा कीर्तिच्या उदरात असतांना तिच्या डोहाळ्यांचे वर्णन केलेले आहे. त्याचप्रमाणे तिच्या बालरूपांचे वर्णन केलेले आहे. राधा नामाच्या प्रत्येक अक्षराचा महिमा सांगितला आहे.

पान नं. ६५ रमाया 'रः' स्याद्यः सकलभगवाच्यो भवतु सः
श्लोक नं. १९ सदाद्यागोप्या 'आ' व्रजभुवि कृतं क्रीडनमिदम्।
धराया 'धः' सर्वान् वितरतु धरैश्वर्यमधुना।।
द्वितीयोऽऽकारः स्याद्विमलविरजायाः सुमतिदः।।

श्रीकृष्ण जन्म देखील ह्याच सर्गात आलेला आहे. कृष्णाचे रूपही वर्णिलेले आहे. वृषभानुची कृष्णाला उत्कण्ठा आणि वृषभानुच्या मनात राधा-कृष्णाच्या विवाहाचा विचार आणि त्याची पेरणी देखील ह्याच सर्गात आलेली आहे आणि हा विचार गर्गाचार्यांकडून पेरण्यात आला असेही येथे कवियत्रीने सांगितले आहे.

**सर्ग चवथा श्रीराधाविवाह प्रस्ताव**

ह्या सर्गात कवयित्रीने वृषभानुच्या मनातील राधा कृष्णाचा विवाह प्रस्ताव सांगितला आहे. ह्या सर्गात कवियित्रीने राधा व श्रीकृष्णाचे वर्णन यथासांग केले आहे. तसेच कीर्ति मालेच्या मनातील श्रीकृष्णाबद्दलची नकारात्मक भावना देखील कवियत्रीने ह्याच सर्गात मांडली आहे. वृषभानुने कीर्तिमालेला राधेच्या आणि कृष्णाच्या विवाहाचा प्रस्ताव सांगितल्यावर तो काळा कृष्ण कसा कसा राधेच्या योग्य नाही हे वर्णन आले आहे. त्याचप्रमाणे आपल्या मातेच्या विरोधाने खिन्न झालेले राधेचे मन देखील ह्याच सर्गात कवियत्रीने वर्णिले आहे. त्याचप्रमाणे कृष्णाची राधेला भेटण्याची उत्कंठा देखील ह्याच सर्गात आली आहे.

**सर्ग पाचवा श्रीराधाविवाहः**

ह्या सर्गात कवयित्रीने राधा माधवाच्या विवाहाच्या सोहळ्याच्या प्रसंगांची कलात्मक साहित्यिकरित्या वर्णने केलेली आहेत. नंद बाबा बाळकृष्णाला घेवून जात असतांना श्रीहरी मनात एक योजना आखतात. वायुदेवाला त्यांचा वेग वाढविण्यास सांगतात आणि नंतर काळ्या वाऱ्याला घाबरून जातात. तेव्हा त्या अंधारात शंभर चंद्रांचे तेज मुखी बाळगणारी राधा त्यांना दिसते आणि ते कृष्णाला तिला सोपवतात. राधा कृष्णाला घेवून अरण्यात निघून जाते. त्यानंतर अरण्याचे



वर्णन येथे केले आहे. बाळकृष्ण किशोरवय धारण करतो. स्वतः ब्रह्मदेव राधामाधवाचे लग्न लावतात, मंत्रोपचार करतात आणि राधा कृष्णाला घेवून पुढे वनात जातात. कृष्ण पुन्हा काळाचे रूप धारण करतो तेव्हा राधा उद्विग्न मनाने त्या श्रीहरीला त्याच्या लिलांबद्दल विचारते. नंतर बाळकृष्णाला ती यशोदेच्या घरी नेवून सोडते आणि स्वगृही कीर्तिमालेच्या सदनी निघून जाते.

**सर्ग सहावा रासलिला**

ह्या सर्गात कवयित्रीने वसंत तथा ग्रीष्म ऋतुचे वर्णन केले आहे. कृष्णाच्या विरहात दुःखी राधा तसेच राधेच्या विरहात दुःखी श्रीकृष्ण ह्यांचे वर्णन येथे आलेले आहे. श्रीकृष्णाच्या बासरीवादनाने वेड्या झालेल्या गोपी त्यांच्या रासलिला ह्या सर्गात कवियत्रीने लीलया वर्णित केल्या आहेत. त्यानंतर झालेला श्रीकृष्णाचा विरह त्या गोपींना कसे वेड लावतो आणि त्या कसे वर्तन करतात हे सगळे ह्या सर्गात वर्णिले आहे. द्वैत आणि अद्वैताचा उल्लेख येथे आलेला आहे. गोपी कृष्णाच्या विरहात असताना कृष्णाला शोधण्यासाठी लता वृक्षांना अतिशय उद्धटपणे विचारतात तेव्हाच तेथे विष्णुच्या तीन अवतारांचा उल्लेख देखील आलेला आहे. राधाकृष्णाची रासलिला येथे वर्णिली आहे. कृष्णाची स्तुती आणि राधेच्या मनात कृष्णाबद्दल असलेले प्रेम देखील ह्याच सर्गात आलेले आहे.

**सर्ग सातवा उद्धवस्य ज्ञानप्रदानम्**

ह्या सर्गात कवयित्रीने उद्धवाचे वर्णन केले आहे. उद्धव हा श्रीकृष्णाचा परम मित्र असतो. तो ब्रह्मदेवाचा शिष्य असतो. त्याला कृष्ण वृंदावनात जाण्यास सांगतो. तेथे असलेले कृष्णाचे आप्तजन म्हणजेच आई-वडील, गोप-गोपिका आणि राधा हे त्याच्या विरहाने व्याकुळ आहेत म्हणून कृष्ण उद्धवाला म्हणतो की तू त्यांना जावून माझ्या कुशलतेचा निरोप दे, म्हणून कृष्णाच्या कुशलतेचा निरोप व पत्र घेवून तो वृंदावनाला येतो. तेथे तो सगळ्यांना कृष्णाचे कुशल सांगतो. नंतर राधेला भेटून तिलाही कृष्णाचे कुशल सांगतो. उद्धवाला ज्ञान प्रदान करण्याकरीता राधा एक लीला रचते आणि त्यामार्फत उद्धवाला भक्ती भावाचे ज्ञान प्रदान करते. प्रेम हेच भक्ती आणि भक्ती हेच प्रेम हे त्याला सोदाहरणाने समजावून सांगते आणि हा सर्ग येथेच संपतो.

**सर्ग आठवा राधाकृष्णवधूमीलनम्**

श्रीदमाने (सुदामाने) दिलेल्या १०० वर्षे राधा कृष्णाच्या वियोगाच्या शापाचा उल्लेख ह्या सर्गात कवियत्रीने केलेला आहे. तो संपण्याचा काळ जवळ आला म्हणून ती सिद्धाश्रमाला जाण्याची इच्छा करते. तेथे ती गोपिकांसोबत जाते. यदुकुळातील संगळ्यांना श्रीकृष्ण राधेची माहिती देतो. ह्या सर्गात सत्यभामाचे गर्वहरण, रुक्मिणीची सेवा ह्या सगळ्या गोष्टी आलेल्या आहेत. त्याच बरोबर राधेची भक्ती आणि प्रेमाची परिसीमा येथे वर्णिली आहे.

''युष्माभिर्यत्कनककलशे क्षीरमादत्तमासी –
दुष्णं तद्वै बहुतरमिदं यच्च राधाऽपिबत्सा।
तस्याः कण्ठात्हृदयकमले प्राप्तमासीद्यदा तत्
तेनैवं मे चरणयुगलं भर्जितं किं च कार्यम्।।''

पान नं. ३२७
श्लोक नं. ४०

**सर्ग नववा स्वधामगमनम्**

अंतिम सर्गात कवियत्रीने राधेच्या गोलोकात जाण्याचे वर्णन केले आहे. विरहाचा काळ संपल्यानंतर ती कृष्णाला भेटायला जाते तेव्हा कृष्णांनी दिलेले आशीर्वाद येथे आलेले आहेत. तसेच कृष्ण नंद, गोप-गोपिका, यशोदा ह्यांना घेवून दिव्य शरीरासोबत गोलोकात माणिकांनी सजवलेल्या रथात घेवून जातो ह्याचे वर्णन आलेले आहे. राधाकृष्णाचे गोलोकात निर्गमन हा ह्या महाकाव्याचा शेवट आहे.

सौ. ललिताशास्त्री आर्वीकर ह्यांची कृष्णावरील भक्ती, पूज्य भावना, अमर प्रेमावरील दृढ विश्वास ह्या संपूर्ण महाकाव्यावरून व्यक्त होतो.

**समीक्षण** : ह्या रचनेची रिती वैदर्भीय असून संपूर्ण रचना ही प्रासादिक आहे. मुळ कथावस्तू ही मर्यादित असली तरी अन्यान्य शास्त्राच्या संदर्भामुळे आणि वैविध्यपूर्ण वर्णनामुळे संपूर्ण कथानक अत्यंत आकर्षक झालेले आहे. जरी ही काव्यरचना वर्णनात्मक असली तरी तिला एक भरीव अशी भक्तीची झालर आहे. ह्या काव्यातील शेवटचे नऊ श्लोक कवयित्रीने श्लोक रूपात दिलेले आहेत. नवव्या श्लोकात फलश्रुती आहे.



संस्कृत साहित्यातील काव्य बहुधा नायक प्रधान असते. परंतु हे नायिका प्रधान आहे. हे काव्य पौराणिक असून कवियत्रीचे पौराणिक ज्ञान आपल्याला लक्षात येते.

हे काव्य महाकाव्य ह्या संज्ञेला पूरक आहे. कारण वर नमूद केलेली महाकाव्यांची सगळी लक्षणे येथे आपल्याला दिसतात.

**काव्यकण्ठचरितम् डॉ. मधुसूदन पेन्ना**

डॉ. मधुसूदन पेन्ना हे मुळचे आंध्रप्रदेशातील आहेत. सध्या ते रामटेक येथील कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयामध्ये स्नातकोत्तर संस्कृत विभागातील दर्शन विभागाचे अधिष्ठाता (विभाग प्रमुख) आहेत. डॉ. पेन्ना हे अत्यंत संशोधक वृत्तीचे अभ्यासक, कुशल प्राध्यापक आणि प्रतिभासंपन्न कवी आहेत. योगशास्त्र हा त्यांच्या विशेष अध्ययनाचा विषय असला तरी देखील सर्वच संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनात त्यांना विलक्षण रूचि आहे. संस्कृत, इंग्रजी, तेलगु, मराठी, हिंदी आणि फ्रेंच या सर्व भाषांवर त्यांचे सारखेच प्रभुत्व आहे. त्यांनी अनेक परिषदांमधून शोधनिबंध वाचन केले आहे आणि विविध विषयांवर व्याख्याने दिली आहेत. त्यांच्या संस्कृत साहित्य क्षेत्रातील कार्यासाठी त्यांना विविध पुरस्कार प्राप्त झाले आहेत. त्यांनी खालील ग्रंथांची रचना केलेली आहे.

| | | |
|---|---|---|
| १. महाकाव्ये | १ | श्रीकाव्यगण्ठचरितम् |
| | २ | प्रज्ञाचाक्षुषम् |
| २. लघुकोश | १ | न्यायकोष (मराठीतून संस्कृत अनुवाद) |
| | १ | आवेदनम् |
| | २ | नरमेधः |
| | ३ | तत्त्वसुषमा |
| | ४ | कृपास्मृति |
| ४. बालसाहित्य | | ३००० पानांमध्ये २३ पुस्तके संपादित केली. |
| ५ अनुदित संस्कृतातून इंग्रजी | १ | |
| | अ) | मनीषापंचक |
| | ब) | अद्वैतसाम्राज्य |

| | | |
|---|---|---|
| | क) | ब्रह्मसूत्रवृत्ति |
| | ड) | सुसंहतभारत |
| | इ) | भूषणसार |
| ६. संस्कृतातून तेलगु | | |
| | १ | निर्णयसिन्धु |
| | २ | वेमभूपालचरित |
| | ३ | भागवतदर्शन |
| | ४ | अव्यक्तोपनिषद् |
| ७. संस्कृतातून संपादित ग्रंथ | | |
| | १ | शिवकाव्य |
| | २ | दर्शनकाशे |
| | ३ | द्रव्यसारसंग्रह |
| | ४ | अभिनवभाष्यम् |
| ८. स्वतंत्र ग्रंथ | १ | योगसिद्धान्त्यन्दिका |
| | ३ | योगमेटाफिजिक्स |
| | ४ | कादम्बरीकथासार |

**काव्यकण्ठचरितम्** :

काव्यकण्ठचरितम् हे काव्य २१ सर्गांमध्ये विभक्त झाले. ह्यामध्ये जवळपास १००० श्लोकांमध्ये आधुनिक वेदर्षि, योगी, पंडित श्री काव्यकण्ठ गणपति मुनिंच्या जीवनाचे वर्णन आहे. ई.स. २००७ साली लिहिल्या गेलेलं हे काव्य ई.स. २०१२ साली चिन्मय इंटरनॅशनल रिसर्च फाऊंडेशन, केरल ह्यांच्याद्वारे प्रकाशित झाले आहे.

**महाकाव्याची कथावस्तु**

काव्यकण्ठचरितम् नावाच्या ह्या काव्याची कथावस्तू ही चरित्र आहे. १८७८ –१९३७ च्या कालखंडात आंध्रप्रदेशचे महायोगी वेदपंडित आणि तपस्वी श्री. काव्यकण्ठ गणपतिमुनि हे भारतात प्रसिद्ध होते. अत्यंत कमी वयात विलक्षण प्रतिभेमुळे सगळ्या लोकांचे आदरपात्र अशा ह्या कवीने वयाच्या १०व्या वर्षी पहिले काव्य रचले आणि एकविसाव्या वर्षी काव्यकण्ठ नावाचे बिरूद 'नवद्वीप'





पंडित सभेत प्राप्त केले. आंध्रप्रदेश, कोंकण, महाराष्ट्र, ओडिशा, तामिलनाडू या प्रदेशांच्या अनेक तीर्थक्षेत्रांमध्ये राहून त्यांनी तपस्या केली आणि देवाचा साक्षात्कार तसेच अस्त्रलाभ देखील प्राप्त केला. ह्यांचे चरित्र अत्यंत उदात्त आणि शांतरसपूर्ण आहे. ह्यांनी भारमातेच्या रक्षणासाठी काव्यरचनांना शस्त्र मानून आपले प्रयत्न सुरू ठेवले. तामिळनाडूचे श्री. रमणमहर्षि ह्यांच्या कडून दीक्षा घेवून गणपति मुनींनी योगानुभव प्राप्त केला आणि वैदिक मंत्राच्या शक्तीचा आविष्कार करून दाखवला अशा ह्या दिव्य चरित्रापासून प्रेरित होवून श्री. मधुसूदन पेन्नांनी ह्या महाकाव्याची रचना केली. ५८ वर्षाच्या काळापर्यंत श्री. गणपती मुनींनी जवळपास १५० पूर्ण ग्रंथ लिहिले. ज्यामध्ये मंत्र, योग, भक्ती शास्त्रांच्या सोबतच वेदान्त शास्त्र आणि वैदिक विज्ञानाचे पूर्ण प्रतिबिंब मिळते.

लहानपणापासून घरात महापुरुष आणि संतमहात्म्यांचे जीवन चरित्रांचे श्रवण होत असल्या कारणाने श्री. मधुसूदन महोदयांवर जो प्रभाव पडला होता त्यापासूनच प्रेरित होवून त्यांनी ह्या काव्याची रचना केली.

ह्या काव्यातील प्रधान रस अङ्गिरस–शांतरस आहे. काव्यनायक 'गणपतीमुनि' हे शमप्रधान मुनी आहेत. काव्यात देवदेवतांचे, तीर्थक्षेत्रांचे, सिद्धिंचे तसेच आध्यात्मिक विषयांचे वर्णन आहे. शृंगार, वीर, रौद्र, बीभत्स, भयानक या रसांना ह्या काव्यात स्थान नाही. परंतु अङ्गरसाच्या रूपात अद्भुत रसाचा निवेश येथे सापडतो. ह्या काव्यात खालील अलंकारांचा जास्त प्रयोग दिसून पडतो.

| | | | |
|---|---|---|---|
| शब्दालंकार : | १) अनुप्रास | २) यमक | |
| अर्थालंकार | १) उपमा | २) रूपक | ३) श्लेषा |
| | ४) विरोधाभास | ५) संदेह | ६) उत्प्रेक्षा |
| | ७) अर्थान्तरन्यास | | |

काव्यात कवीने सुंदर सुभाषितांची देखील रचना केलेली आहे. अलंकारांचा उपयोग तथा सुभाषितांची रचना ह्यावरून कवीचे भाषेवचरील प्रभुत्व आपल्याला कळते. कवीची भाषाशैली अतिशय सुंदर, प्रशंसनीय आहे. त्यामध्ये प्रसादगुण, माधुर्य, लालित्य इत्यादी गुण आढळतात. महाकाव्यांचा वारसा पुढे चालविण्याचा कवीचा हा प्रयत्न निश्चितच शिरोधार्य आहे. ह्या महाकाव्याने संस्कृत साहित्यात मोलाची भर घातलेली आहे.

**प्रज्ञाचक्षुषम् :**

प्रस्तुत महाकाव्याचे रचियता डॉ. मधुसूदन पेन्ना आहेत.

**महाकाव्याविषयी :**

प्रज्ञाचाक्षुषम् हे डॉ. मधुसूदन पेन्ना ह्यांचे महाकाव्य न्यू भारतीय बुक कॉर्पोरेशन दिल्ली या संस्थेने २०१४ साली प्रकाशित केले. या महाकाव्याच्या मुखपृष्ठावर श्री गुलाबराव महाराजांचे चित्र आहे. तर पुस्तकाच्या वेष्टनाच्या मागील भागावर डॉ. पेन्ना यांचा संक्षिप्त परिचय दिला आहे. या महाकाव्यात ८५० श्लोक असून ते ११ सर्गांमध्ये विभाजित आहेत. कवीने सर्गांना 'ईक्षण' असे म्हटले आहे. यापैकी १० ईक्षणांमध्ये गुलाबराव महाराजांचे संपूर्ण चरित्र अतिशय पद्धतशीरपणे कवीने काव्यबद्ध केले आहे, तर शेवटच्या ११व्या ईक्षणामध्ये गुलाबराव महाराजांचे संपूर्ण तत्त्वज्ञान सांगितले आहे. या भागाला कवीने 'गुलाबगीता' असे शीर्षक देऊन संस्कृत साहित्यातील गीता वाङ्मयात मोलाची भर घातली आहे. श्री. गुलाबराव महाराजांच्या स्मृतिशतक महोत्सवात एका भव्य कार्यक्रमात, नागपूर येथे अनमोल अशा ह्या ग्रंथाचे लोकार्पण करण्यात आले.

या महाकाव्याच्या आरंभी डॉ. मधुसूदन पेन्ना यांची आंग्ल भाषेतील प्रस्तावना आहे. त्यात महाकवीने महाकाव्याच्या निर्मितीची भूमिका स्पष्ट केली आहे. श्री गुलाबराव महाराजांचा हा काव्यबद्ध चरित्रग्रंथ निर्माण करण्याचे भाग्य आपल्याला लाभले याबद्दल ते स्वतःला धन्य मानतात.

**महाकाव्याची वैशिष्ट्ये**

'प्रज्ञाचक्षुषम्' हे १९३ पृष्ठांचे महाकाव्य वाचत असतांना अनन्य-साधारण असा ब्रह्मानंद-सहोदर असा काव्यानंद प्राप्त होतो. त्या आनंदडोहात अवगाहन करीत असतांना ह्या महाकाव्याची काही वैशिष्ट्ये प्रकर्षाने जाणवली ती अशी

'प्रज्ञाचक्षुषम्' हे अर्वाचीन काळातील म्हणजे अगदी अलीकडच्या काळातील २१ व्या शतकातील द्वितीय-दशकातील महाकाव्य असले तरीदेखील कवीने महाकाव्य रचनेची पारंपारिक पठडी सोडलेली नाही. ११ सर्ग, प्रत्येक सर्गामध्ये भिन्न भिन्न श्लोकसंख्या, प्रत्येक सर्गाच्या शेवटी पुष्पिकेमध्ये स्वतःचा नामोल्लेख, एका सत्पुरुषाला नायक म्हणून निवडणे, विविध प्रसंगांचे वर्णन, सर्गान्ती भिन्न वृत्तातील श्लोक ही सर्व महाकाव्य लक्षणे येथे आढळतात.



या महाकाव्याचे 'प्रज्ञाचक्षुषम्' हे शीर्षक अत्यंत समर्पक आहे. गुलाबराव महाराजांना प्रज्ञारुपी दिव्य चक्षु लाभले होते आणि म्हणून त्यांना 'प्रज्ञचक्षु' या विशेषणाने संबोधिल्या जाते. नायकाच्या या विशेषणाचा सम्यक उपयोग करून कवीने या महाकाव्याला हे शीर्षक देऊन अतिशय औचित्य साधले आहे.

डॉ. मधुसूदन पेन्ना यांनी या महाकाव्यातील सर्गांना ईक्षण अशी संज्ञा दिली आहे. ती अतिशय मनोज्ञ वाटते.

या महाकाव्यात आठव्या आणि नवव्या अशा दोन ईक्षणांमध्ये ज्ञानेश्वर महाराजांची संपूर्ण कथा आली आहे. एका सत्पुरुषाचे चरित्र सांगत असताना त्याचे दैवत असलेल्या दुसऱ्या महानुभावाचे चरित्र सांगण्याची कवीची ही पद्धत मनाला भावते, लक्षणीय वाटते.

कवीने गुलाबराव महाराजांच्या जन्माचा उल्लेख करताना त्यांच्या जन्मतिथीचा निर्देश केला आहे.

वृषावनार्थं वृषभारख्यवर्षे गोंदूजिरावस्य कुलप्रदीपः
आषाढमासे दशमीतिथौ स जज्ञे महारत्नामिवाम्बुराशेः ।।

या महाकाव्याचे ११ वे 'ईक्षण' आगळे वेगळे आहे. याला कवीने 'गुलाबगीता' असे स्वतंत्र नाव देऊन त्याचे स्वतंत्र अस्तित्व सूचित केले आहे. त्यामुळे ज्याप्रमाणे महाभारतातील 'श्रीमदभगवद्‌गीता' एका स्वतंत्र ग्रंथाच्या रूपाने प्रसिद्ध झाली त्याचप्रमाणे ही 'गुलाबगीता' 'प्रज्ञाचाक्षुषम्' या महाकाव्याचा अंश असून देखील एक स्वतंत्र ग्रंथ म्हणून नावारूपास येईल यात शंका नाही.

अशाप्रकारे गेल्या १८ वर्षात नागपूरात तीन महाकाव्ये प्रकाशित झाली. त्यापैकी 'राधायनम्' हे पुराणकथेवर आधारीत स्त्रीप्रधान महाकाव्य आहे तर दुसरे 'काव्यकण्ठचरितम्' हे गणपतिमुनींच्या व्यक्तीगत जीवनावर आधारीत आहे. 'प्रज्ञाचाक्षुषम्' हे श्रीगुलाबराव महाराजांच्या जीवनावर आधारीत महाकाव्य आहे. तिन्ही महाकाव्ये अतिशय वाचनीय आहेत.

□□□

प्रकरण तिसरे

# लघुकाव्य स्फुटरचना

संस्कृत साहित्यात महाकाव्यासोबतच लघुकाव्य हा प्रकार देखील अत्यंत आल्हाददायक आहे. ही लघुकाव्ये साधारणतः १००-१२५ श्लोकांनी युक्त असतात. कधी कधी एका विशिष्ट कथानकाला किंवा व्यक्तिच्या जीवनाला धरून असतात तर कधी कधी त्यात सुभाषितांसारख्या स्फुट रचनांचा संग्रह केलेला आढळतो. नागपूरात गेल्या दशकांत काही लघुकाव्ये निर्माण झाली. त्यांचा परिचय प्रस्तुत प्रकरणात अंतर्भूत आहे.

## कूजनम्

'कूजनम्' हा कवी नीरव यांचा संस्कृत काव्यसंग्रह नागपूर येथील ख्यातनाम विजय प्रकाशनाने १४ जानेवारी २००७ रोजी प्रकाशित केला. कवी नीरव म्हणजे डॉ. नीलकण्ठ रघुनाथ वऱ्हाडपांडे हे एक अनन्यसाधारण व्यक्तिमत्त्व, मनोविज्ञान, वेदवाङ्मय, अभिजात संस्कृत साहित्य, वैदिक गणित, नव्यन्याय, पुरातत्त्व, इतिहास, भाषाविज्ञान इत्यादी विषयांचे निरलसपणे अनवरत अध्ययन, संशोधन आणि लेखन करणारे डॉ. वऱ्हाडपांडे त्यांच्या संशोधनपूर्ण तर्कशुद्ध लिखाणामुळे आणि व्याख्यानामुळे सर्वांना सुपरिचित आहेत. पण त्याचबरोबर ते एक प्रतिभासंपन्न कवी देखील आहेत. प्रखर बुद्धिमत्ता, सूक्ष्म निरीक्षणशक्ती, सत्यान्वेषी वृत्ती, तर्कशुद्ध विचारसरणी, परिश्रमशीलता आणि अतुलनीय रसिकता या सर्वांचा सुरेख संगम त्यांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये आहे. त्याचबरोबर साधेपणा, तत्परता, अनहंकारिता, प्रसिद्धिपराङ्मुखता ही त्यांची वैशिष्ट्ये सर्वांना त्यांच्यासमोर आदराने नतमस्तक करतात. शासकीय सेवेतील आणि व्यक्तिगत जीवनातील जबाबदाऱ्या यशस्वीपणे पार पाडित असतांना त्यांनी आपला व्यासंग आणि संशोधनकार्य सातत्याने गतिशील ठेवले आणि संस्कृत पत्रकारीतेच्या क्षेत्रातही मौलिक योगदान दिले. त्याचबरोबर





कवित्वाचा निसर्गदत्त बीजरूप संस्कारही जपला आणि 'कूजनम्' च्या रूपाने अर्वाचीन संस्कृत साहित्याचे आगार समृद्ध करण्यास हातभार लावला.

'कूजनम्' या ८० पृष्ठांच्या काव्यसंग्रहाचे मुखपृष्ठ अतिशय साधे आणि चित्ररहित आहे. मलपृष्ठावर काहीही मजकूर मुद्रित नाही. कवीने हे पुस्तक अतिशय आनंदाने मायेला अर्पण केले आहे. ते म्हणतात –

मयोद्भूतं जगत्सर्व मन्यन्ते ब्रह्मावादिनः।
अर्पये काव्यसम्भारं मायायै प्रीतमानसः।।

पुस्तकाचे शेवटी सुमारे साडेतीन पृष्ठांमध्ये कवीचा विस्तृत परिचय दिलेला आहे. कुणाचीही प्रस्तावना, अभिप्राय किंवा पुरस्कार पुस्तकामध्ये अंतर्भूत नाही. एकवीस कवितांच्या या संग्रहांच्या आरंभी कवीने आंग्ल भाषे 'Apology' मध्ये आपले विचार व्यक्त केले आहेत. त्यात त्यांनी संस्कृत भाषेची श्रेष्ठता, इंग्रजी भाषेचे अवास्तव प्रेम याविषयीची आपली मते परखडपणे मांडली आहेत.

'कूजनम्' मध्ये एकवीस कविता अंतर्भूत आहेत. यापैकी काही कविता अतिशय लहान आहेत तर काही बऱ्याच दीर्घ आहेत. प्रत्येक कवितेच्या आरंभी कवीने त्या कवितेचे वृत्त नमूद केले आहे. पहिली कविता आहे 'जलबिघन्दवः' या कवितेत १०२ श्लोक असून अनुष्टुभ हा यातील मुख्य छंद आहे. मधे मधे अन्य छंदांचा उपयोग कवीने केला आहे. जलबिंदुमधून कवीच्या मनात आलेले विचार या कवितेत आहेत. दुसरी 'स्वस्ति मातृभूमे' ही ३३ कडव्यांची कविता चंद्रकांत वृत्तांत आहे. यामध्ये कवीने मातृभूमिप्रेम शब्दांकित केले आहे. तिसऱ्या 'नेहरूगीता' या आठ श्लोकांच्या अनुष्टुभ छंदातील कवितेमध्ये कवीने पं. नेहरूंचे उपहासात्मक वर्णन केले आहे.

नेहरू नेहरोः पुत्री नप्तारी चैव नेहरोः।
नेहरूणां शुनश्चापि नित्यं प्रातः स्मरेत्ररः।।

हा श्लोक अतिशय मार्मिक आहे. यानंतरची 'निश्वासाः' ही कविता दीर्घ म्हणजे ३६ श्लोकांची आहे आणि हे सर्व श्लोक पृथ्वी छंदातील आहेत. प्रियेच्या विरहाचे प्रियकराचे दुःख व्यक्त करणारी ही कविता भावाभिव्यक्तीचे उत्तम उदाहरण आहे.

यानंतरच्या 'पुनरागमनम्' या कवितेला कवीने 'पर्जन्यरूपकम्' असेही शीर्षक दिले आहे. यात निसर्गाचे अतिशय लालित्यपूर्ण वर्णन आहे. यानंतर 'शृङ्गारसौरभम्'

हे प्रदीर्घ काव्य आहे. या काव्याचा पूर्वी कवीने 'मानवी जीवनात शृंगाराचे स्थान आणि आवश्यकता' याविषयी विस्तृत शास्त्रशुद्ध विवेचन केले आहे. काव्यात कवीने कामशास्त्रातील पारिभाषिक संज्ञांचा प्रयोग केला आहे आणि ते शब्द ठळकपणे मुद्रित केलेले आहेत. उदा. हरविक्रम, करिपद, व्यानत इत्यादी. शार्दूलविक्रीडित, वसंततिलका, स्वागता, शिखारिणी या छंदांचा उपयोग कवीने या काव्यात केलेला आहे. काव्याचे स्वरूप त्याच्या शीर्षकावरूनच स्पष्ट होते.

यानंतरच्या 'बलिदानम्' या काव्याचे 'आवाहनम्' आणि 'प्रत्युत्तरम्' असे दोन भाग आहेत. प्रथम भागामध्ये ९ तर द्वितीय भागामध्ये १९ कडवी आहेत. अक्रूर या संस्कृतात दुर्मिळपणे आढळणाऱ्या छंदामधील हे श्लोक अतिशल सुंदर आहेत.

तनुकुसुमं मे त्वमेव शोकविहीना।
पादयोः समर्पय मातुः।।
इयमेका मे काङ्क्षा जीवसुमस्य।
तत्रैव भवेत्रिर्माल्यम्।।
मा चिरय धारय स्वान्तम्।
निःसारय कातरिमाणम्।।
करकमलाभ्यां स्वयमुपहारसमं मे।
पादयोः समर्पय मातुः।।

हे कडवे कवीच्या मनातील उत्कट राष्ट्रभक्ती व्यक्त करते. या कवितेसोबतच 'आकाङ्क्षा' ही छोटीशी कविताही कवीच्या भावतर मनाचे दर्शन घडविते.

अक्रूर छंदामुळे ही कविता अधिक सुंदर झाली आहे. येथे कवीने ताऱ्यांना आपल्याला योग्य मार्गदर्शन दर्शविण्यासाठी प्रार्थना केली आहे.

'पुर्नमिलन्' ही शार्दूलविक्रीडित छंदाती १६ श्लोकांची कविता अतिशय आकर्षक आहे. हे एक सुंदर निसर्गगीत आहे. 'आधार' एकमात्र ही केवळ ८ पंक्तीची कविता आनन्दकन्द छंदातील आहे. 'प्रेम हे मनाचे बंधन नसून या विशाल संसारसागरातील तो एकमेव आधार आहे' असे येथे कवीला तीव्रपणे जाणवते.

'बन्धुद्वितीया' या भाऊबीजेवरील कवितेत एका निर्धन भावाच्या अगतिकतेचे आणि भगिनीप्रेमाचे सुंदर दर्शन कवीने घडविले आहे.

'प्राणैः सह सकलं वात्रिछतमस्तं यातम्' या दीर्घ शीर्षकाची भूपति छंदातील



२७ श्लोकांची कविता कारुण्यपूर्ण आहे. चक्रवाकीची विरहव्याकूळ अवस्था आणि शेवटी दुःख सहन न होऊन तिचे प्राणोत्क्रमण या प्रसंगाचे सुंदर वर्णन कवीने केले आहे.

'नन्या विरहगीतम्' या कवितेमुळे कवीची निसर्गाला बोलकं करणारी लेखणी रसिकांना आकर्षित करते. भूपति छंदाती हे वीसही श्लोक अतिशय मनोवेधक आहेत. 'मानिनीं प्रति' या चंद्रकांत छंदाती ९ श्लोक अतिशय निसर्गातील विविध दाखले देऊन प्रियतमेचा अनुनय करीत आहे.

'मधुरा अस्वस्थताः ही कविता केवळ ५ श्लोकात्मक आहे. प्रियकर आणि प्रेयसी यांच्या मनातील अस्वस्थता येथे कवीने वर्णिली आहे. यानंतरची 'क्रीडाकौतुकम्' ही श्लोकांची कविता चंद्रकांत छंदाती आहे. एक बालक आकाशामध्ये दिसणाऱ्या सर्व दुष्प्राप्य गोष्टींशी खेळण्याची इच्छा व्यक्त करीत आहे. कवीची ही कल्पना अतिशय मनोरम आहे.

'हस्तदर्दुरौ' या कवितेमध्ये भूपति छंदाती १७ श्लोक आहेत. उंच भरारी मारण्याची इच्छा करणाऱ्या हंसासोबत आकाशात पोहोचलेल्या एका बेडकाचा कसा दुर्दैवी अंत झाला हे येथे वर्णिले आहे. 'प्रस्थानम्' ही सात श्लोकांची कविता धवलचंद्रिका छंदात आहे. मनुष्य जेथून आला आहे तेथेच त्याला पुन्हा जावयाचे आहे हे जीवनातील कटु सत्य येथे कवीने मांडले आहे. 'आवाहनम्' या कवितेमध्ये वरमजला छंदातील सात श्लोक आहेत.

'प्रेमजो मृगः ही कविता केवळ दोनच श्लोकांची आहे. 'पद्मावती' या धवचंद्रिका छंदातील कवितेचा हा काव्यसंग्रह संपतो. या कवितेमध्ये नायकाच्या मनातील प्रेमभावना कवीने हळुवारपणे शब्दांकित केली आहे.

कवी नीरव यांच्या 'कूजनम्' मधील सर्वच कविता अतिशय भावपूर्ण आहेत. सूक्ष्म निरीक्षणशक्ती, कवीच्या मनाची रसिकता, भावकोमलता, हळवेपणा आणि राष्ट्रप्रेम या कवितांमध्ये प्रतिबिंबीत झाले आहे. कवीने जेवढ्या उत्कटतेने ' शृंगारसौरभम्' रचले आहे. तेवढ्याच उत्कटतेने आवाहनम्' सारखी कविता लिहिली आहे. शृंगार, वीर, करुना, शांत ह्या सर्वच रसांमध्ये कवीची लेखणी अगदी लीलया विहार करतांना आढळते. कवीची भाषा मधुर आणि प्रासादिक आहे. ज्येष्ठ पिढींच्या भाषेचा भारदस्तपणा 'कूजनम्' मध्ये पुरेपूर आढळतो. छंदाचे वैविध्य हा या काव्यसंग्रहाचा एक खास विशेष. आज छंदोबद्ध रचना करणारे कवी फार

थोडे आढळतात हे कटु सत्य आहे. डॉ. नी.र.वऱ्हाडपांडे यांची मात्र प्रत्येक कविता छंदोबद्ध आहे. शार्दूलविक्रीडित, मन्दाक्रान्ता, वसन्ततिका या प्राचीन वृत्तांसह भूपति, चंद्रकांत इत्यादी आधुनिक छंदाचाही उपयोग कवीने अत्यंत कौशल्याने केला आहे. कवीचे हे कौशल्य आणि छंदाचा काटेकोर अभ्यास नवीन पिढीला आश्चर्यचकित करणारा आहे. या सर्व वैशिष्ट्यांमुळे रसिकांना ब्रह्मानंद सहोदर असा अपूर्वकाव्यानंद देणारे हे पुस्तक म्हणजेच संस्कृत साहित्य सरस्वतीच्या मूल्यवान भांडागारातील एक बहुमोल रत्न आहे यात संदेह नाही.

## काव्यमधुपर्क :

ह्या काव्याचे लेखक पं. मुरलीधर गणेश पाठक हे आहेत.

**परिचय –** ह्यांचा जन्म नागपूरच्या परंपरागत प्रसिद्ध कीर्तनकार घराण्यात २/२/१९३० साली झाला. कीर्तनकला अनुवंशिक असल्याकारणाने बालपणापासूनच ते बालकीर्तनकार म्हणून सुपरिचित होते. संस्कृत भाषेवर प्रभुत्व मिळविण्यासाठी त्यांनी स्थानिक भोसला वेदशास्त्र संस्कृत महाविद्यालयाचे प्राचार्य के. वेदशास्त्रसंपन्न पंडित शंकरशास्त्री आर्वीकर आणि त्यांचे शिष्योत्तम वे.शा.स.पं. अंबादासशास्त्री पांडे गुरुजींच्या शिष्यत्वात 'शास्त्री' ही उपाधी प्राप्त केली. अन्य षड्दर्शन शास्त्रांचे अध्ययन त्यांच्याच मार्गदर्शनाखाली गुरुकुलपद्धतीने केले. जेव्हा काव्यनिर्मितीची इच्छा निर्माण झाली तेव्हा कविवर्य महामहोपाध्याय कै. केशव उपाख्य बापूजी ताम्हणद्वारा रचित संस्कृत काव्याचा त्यांनी अभ्यास केला आणि त्यांची काव्यशैली आत्मसात केली.

काव्यमधुपर्काची रचना करणारे मान्यवर पाठकशास्त्री संस्कृत शिक्षक होते. त्यांना स्वभावतः रिकामे बसणे आवडत नव्हते. एकदा राज्य कर्मचारी आणि शिक्षक ह्यांचा ५० दिवसांचा संप झाला होता. त्यात त्यांनी सदाचार नावाची काव्य निर्मिती केली. २०११ मध्ये ह्यांनी इहलोकीची यात्रा संपविली.

### काव्याविषयी :

ह्या लघुकाव्याला एकूण १२ अंतर्भाव आहेत. परंतु वाचकांच्या सोयीसाठी त्याचे प्रमुख तीन भाग केले आहेत.

### स्वर्णपदम् :

महाभारताच्या वनपर्वातील कथेनुससार एकदा द्रौपदीने सोन्याचे कमळ बघून त्याला मिळविण्याची इच्छा केली. त्यावेळी भीम त्याला आणून देण्याच्या प्रतिज्ञेने



निघून गेला. कुबेराच्या उपवनातून ते कमळ आणून देताना त्याला कोणकोणत्या परिस्थितीला समोर जावे लागले आणि शेवटी ते कमळ त्याने द्रौपदीला कसे आणून दिले ह्या घटनांचे रोचक आणि मनोहारी वर्णन येथे दिसून येते. भीम, यक्ष आणि हनुमान ह्यांच्यातील संवाद विलोभनीय आहे. त्यामध्ये एकूण ४१ श्लोक आहेत.

### जगत्पाल कथा :

'भक्तमालिका' ह्या ग्रंथात जगत्पाल कथेच वर्णन विस्तृतरित्या वर्णिलेल आहे. या प्रसिद्ध कथेमध्ये जगत्पालाची बायको त्याला अनुकूल होती. याचकांना आणि अतिथिंना 'आई' म्हणजेच लक्ष्मी स्वरूप वाटत होती. प्रस्तुत प्रसंगात जगत्पालाची दिनचर्या ही अतिशय मार्मिकपणे वर्णविली आहे. त्यामध्ये ४७ श्लोक आहेत.

### प्राचीन संस्कृतीचे स्मरण :

भारतातील भारतीय संस्कृतीचे दर्शन ह्या खंडात केले आहे. सूर्योदयापूर्वी उठून प्रातः स्मरण, घरातील बायकांनी घराच्या अंगणाची साफसफाई शेणाने आंगण सारवून रांगोळी काढणे, विद्यार्थ्यांची आंघोळ संध्या करून त्यांचे अध्ययनाला बसणे ह्या सगळ्यांनी आनंदित राहणे असे दृश्य कधी दिसेल? असे कवीने येथे उद्धृत केले आहे.

### समस्यापूर्ति :

ह्यामध्ये कवीने 'क्रियासिद्धि सत्वे', 'गोविंद दामोदर माधवेति', 'मधुर इति समूलं भक्षणीय किमिक्षुः' आदि समस्यापूर्ति विषय अंतर्भूत केले आहेत. सुकन्या, प्रल्हाद, श्रीकृष्ण, अर्जुन आणि सद्यस्थितीच्या सदाचारी लोकांचे दृष्टांत हे काव्याचा आधार आहेत. गोविंद दामोदर माधवेति ह नवीन रचना आहे. इथेच पहिला खंड समाप्त होतो.

ह्या काव्याचा महत्त्वपूर्ण विभाग हा 'अंतर्लापिका' होय. ह्यात शेवटचे पद किंवा पदे रेखांकित आहेत. पदाचा पदच्छेद कसा करायचा हे खाली स्पष्ट दिले आहे.

बहिर्लापिकेत बाहेरच्या पदांचा आश्रय घ्यावा लागतो. अंतर्लापिका व बहिर्लापिका ही प्रकरणे दोन मित्रांचा संवाद असल्याप्रमाणे आहेत.

ह्या पुस्तकाला एकूण १६८ पृष्ठे आहेत. ह्याचे प्रकाशक पं. मुरलीधर पाठक हे आहेत. त्यांची प्रथम आवृत्ती एप्रिल २००५ साली आली होती. ह्या काव्यात एकूण ५१३ श्लोक आहेत.

कवीने नवीन शब्दांचा प्रयोग काव्यात केला आहे. संस्कृत भाषेच्या उद्धारासाठी कवींचा प्रयास परिलक्षित होतो. कवींचे शब्दवैभव विशाल आहे. प्रस्तुती करण्यात देखील कवी मागे नाहीत. ह्यांना नव्या संस्कृतीत रुचि नाही. ते प्राचीन परंपरेचे प्रचारक आहेत. गणपतिचे नितांत उपासक आहेत. काव्यमधूपर्क हे अतिशय सुंदर काव्य आहे. यात व्याकरणाचेही विविध प्रकार दिसतात. ह्या सर्व रचना छंदोबद्ध आहेत. त्यावरू कवीचे छंदावरील प्रभुत्व स्पष्ट होते. पदलालित्यात ते अग्रेसर आहेत.

**नरमेधः**

एक प्रकाशित आणि एक अप्रकाशित अशा दोन महाकाव्यासोबतच डॉ. पेन्ना यांनी दोन लघुकाव्यांची रचना केली. डॉ. पेन्ना यांचे हे ४३ श्लोकांचे लघुकाव्य आहे. ते 'अर्वाचीनसंस्कृतम्' या त्रैमासिकाच्या जानेवारी २००२ च्या अंकात प्रसिद्ध झाले आहे. श्लोकसंख्येनुसार हे काव्य लघु असले तरी देखील अतिशय वाचनीय आहे. ११ सप्टेंबर २००१ रोजी न्यूयॉर्क येथील वाणिज्य संकुलाच्या इमारतीवर अतिरेक्यांनी केलेल्या हल्ल्याचे आणि तेथे झालेल्या विध्वंसाचे वर्णन येथे कवीने अतिशय सुंदर रीतीने केले आहे. न्यूयॉर्क शहर तेथे असलेली ती अनेक मजली भव्य इमारत, तेथे चालणारी महत्त्वपूर्ण वाणिज्यकार्ये त्या इमारतीवर अतिरेक्यांनी केलेला हल्ला तेथे लागलेली आग, बचावासाठी लोकांनी केलेली धडपड आणि धावपळ, त्यांचा आक्रोश, तेथे झालेली हानी ह्या सर्वांचे जणू काही कवी प्रत्यक्षदर्शी आहेत असे वाटावे इतके सजीव आणि सूक्ष्म वर्णन कवीने केलेले आहे. आणि शेवटी विश्वशांतीसाठी प्रार्थना करून आपले हे लघुकाव्य संपविले आहे. या काव्याचे 'नरमेध' हे शिर्षक अत्यंत समर्पक आहे. कविची भाषा अतिशय सोपी कोठेही काठिण्य किंवा दुर्बोधता जाणवत नाही. नुकत्याच घडून गेलेल्या अत्यंत निंदनीय अशा घटनेचे वर्णन करणारे हे आधुनिक काव्य संस्कृत साहित्यातील इतर लघुकाव्यापेक्षा निश्चितच आगळे-वेगळे आहे.

**आवेदनम् :**

हे डॉ. मधुसूदन पेन्ना यांचे दुसरे लघुकाव्य. हे लघुकाव्य 'अर्वाचित संस्कृतम्' ह्या त्रैमासिकाच्या जुलै २००२ च्या अंकात प्रकाशित झाले आहे. एकूण ५४ श्लोक असलेले हे लघुकाव्य अतिशय सुंदर आहे. हे लघुकाव्य म्हणजे गायत्रीदेवीचे स्तोत्र आहे. संपूर्ण विश्वाच्या मुळाशी असलेली ही गायत्री देवता वेदकाळात सावित्री या नावाने प्रथित होती. जगातील सर्व घटना तिच्या प्रभावाने घडत



असतात त्या गायत्री देवतेचे अतिशय सुंदर विशेषणाद्वारे अत्यंत मनोरम वर्णन कवीने केले आहे.

गायत्री देवीचे वर्णन करतांना त्यांनी प्रयुक्त केलेली विशेषणे अत्यंत अर्थपूर्ण आणि साभिप्राय आहे. कवीने अत्यंत भक्तिभावाने गायत्री देवीला प्रार्थना केली आहे. ह्यावरून कवीच्या मनातील ईश्वर भक्ती, श्रद्धाळूपणा विश्वशक्तीकडे बघण्याचा दृष्टिकोन, विनम्रता इत्यादी वैशिष्ट्ये स्पष्टपणे जाणवतात. संपूर्ण काव्य छंदोबद्ध आहे. भाषा प्रासादिक आणि नाद मधुर आहे. त्यामुळेच हे लघुकाव्य वाचतांना एक आगळा-वेगळा काव्यानंद अनुभवता येतो. या काव्यामुळे संस्कृत स्तोत्र वाङ्मयात मोलाची भर पडली आहे. या लघुकाव्याचा एक खास विशेष म्हणजेच काव्याच्या अंतिम श्लोकात कवीने त्यांचे पिता नृसिंह शर्मा आणि माला भारती यांचा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केला आहे. आपण यांचे कनिष्ठ पुत्र असल्याचे नमूद केले आहे आणि त्यांना सविनय वंदन केले आहे.

**स्फुटकाव्य**

**प्रहेलिकाशतकम्**

हे प्रस्तुक सौ. दुर्गा पारखी ह्यांनी लिहिलेले आहे. ह्याला एकूण ३१ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावरी लहान मुलांची चित्रे आहेत. पृष्ठभागावर सौ. दुर्गा पारखी ह्यांचा परिचय दिलेला आहे. त्या सेवानिवृत्त शालेय शिक्षिका आहेत. ह्याचे प्रकाशन विश्व-संस्कृत-पुस्तक मेला बेंगलूरू येथे २०११ साली झाले.

**लेखिकेचा परिचय**

लेखिका राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, नागपूर विद्यापीठाची वाङ्मय पारंगत परीक्षा प्रथम क्रमांकानी उत्तीर्ण आहेत. त्या एम्. फिल्. देखील आहेत. सेवानिवृत्त शालेय शिक्षिका आहेत. त्याचप्रमाणे अध्यापनात कुशल ओत. त्या नागपूर विद्यापीठ तसेच कालिदास संस्कृत विश्वविद्यापीठाबरोबर ही सबंद्ध आहेत. प्रौढजनांसाठी त्या संभाषण वर्ग देखील चालवतात.

प्रस्तुत पुस्तकात १०० प्रहेलिकांचा संग्रह आहे. लहान मुलांना संस्कृत भाषेत गोडी निर्माण व्हावी ह्या हेतूने सौ. पारखींनी ह्या प्रहेलिका रचल्या आहेत. कुठे-कुठे एकाच उत्तराच्या दोन-३ प्रहेलिका त्यांनी रचल्या आहेत. उदा. जिव्हा मार्ग ह्या उत्तरांसाठी ३ प्रहेलिका, शंख, रेलयान, नारळ, कन्दुक ह्यांसाठी २ प्रहेलिका.

ह्या पुस्तकात प्रहेलिकांची उत्तरं तसेच कठीण शब्दांचे अर्थ हे संस्कृत, मराठी, हिंदी, इंग्रजी ह्या चारही भाषांमध्ये दिलेली आहेत. प्रत्येक प्रहेलिका ही विशिष्ट एका छंदात लिहिलेली असून प्रहेलिकेच्या शेजारी छंदाचे नाव दिलेले आहे. पहिल्या सहा प्रहेलिका ह्या मंगला चरणाच्या आहेत. सुरुवातीला सोप्या आणि नंतर कठीण होत गेलेल्या ह्या प्रहेलिकांचा क्रम ठरलेला आहे.

हे पुस्तक सौ. पारखी महादेयांनी त्यांचे काका, काकू आणि वडील ह्यांना समर्पित केले आहे. बालोपयोगी असल्या कारणाने एकूणच भाषा साधी, सुबोध आणि सोपी आहे. प्रत्येक प्रहेलिकेत दिलेल्या छंदावरून लेखिकेचे छंदावरील प्रभुत्व येथे लक्षात येते. संस्कृत साहित्यात प्रहेलिका हा काव्य प्रकार नवीन नाही पण आजच्या युगातील नवनवीन वस्तूंवर रचलेल्या ह्या सर्वच प्रहेलिका अत्यंत मनोरंजक आहेत. ह्या कार्यावरून लेखिकेचा संस्कृत प्रचारिकेचा थाट स्पष्ट होतो.

**संस्कृतगङ्धारा**

हे काव्य सौ. आशा पांडे ह्यांनी लिहिलेले आहे. संस्कृत, मराठी, हिंदी, उर्दू, आङ्गलभाषा इत्यादी भाषांमध्ये त्या काव्यरचना करतात. ह्या पाचही भाषांमध्ये त्यांनी स्फुटकाव्ये रचली आणि त्याला पंचगङ्गाधारा असे नाव दिले. ह्या पंचगंगा धारेतील प्रथम धारा ही संस्कृत भाषेत आहे. ह्या प्रथम धारेत एकूण १७ कविता आहेत. कवितांचे विषय हे गणपती, शारदा, संस्कृतभाषागौरव, संस्कृतमहात्म्य, विष्णुनमन, शिवप्रार्थना, कृष्णवन्दन, गंगावर्णन, हिमालयप्रशंसा, महाजन, शुभाकांक्षा, भारतमाता, चित्र, पुष्पवाटिका, सुभाषित असे विविध आहेत.

कवियित्रीची भाषा साधी व सोपी आहे. कुठेही क्लिष्टता नाही. लेखिकेचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व येथे आपल्याला दिसते. लेखिकेचा हा प्रयत्न नक्कीच शिरोधार्य आहे. त्यांच्या संस्कृत काव्यरचना 'भवितव्यम्' ह्या साप्ताहिकातून प्रकाशित होत असतात.

**संस्कृत अत्यांक्षरी मञ्जूषा**

प्रभा घुले यांनी रचलेलं प्रस्तुत पुस्तक आहे. श्रीमती घुलेंचा जन्म १९४७ नागपूर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षणही नागपूरातच झाले आहे. तसेच महाविद्यालयीन शिक्षणही नागपुरातील आहे. वायुसेना केंद्रीय विद्यालयात त्यांनी १५ वर्षे अध्यापनाच्या कार्याची धुरा सांभाळली आहे. नागपूरच्या आकाशवाणीच्या संस्कृत सूर भारती या कार्यक्रमात त्यांचा भाषण रूपाने सहभाग आहे.



२०११ मध्ये प्रस्तुत पुस्तक क.का.सा.वि. यांच्याद्वारे प्रकाशित झाले आहे. संस्कृत अत्यांक्षरी मञ्जूषा या काव्यसंग्रहात अतिशय सोप्या संस्कृत सुभाषितांचा संग्रह करून आजच्या युगातील अत्यांक्षरींच्या नियमाप्रमाणे प्रत्येक श्लोकाच्या अंतापासून सुरू होणारा दुसऱ्या श्लोकापर्यंतचे संग्रहण येथे कवयित्रीने केले आहे.

**श्री गणेश वंदना**

प्रस्तुत पुस्तक २०१५ साली क.का.सा.वि यांच्याद्वारे प्रकाशित करण्यात आले. श्री गणेश वंदना या काव्यसंग्रहात श्रीमती घुलेंनी गणपतीला समर्पित छोट्या छोट्या स्वरचित काव्यांचा संग्रह केलेला आहे.

या दोन्ही काव्यसंग्रहांमध्ये कवियित्रीने सर्वपरिचित सुभाषिते आणि अतिशय सोप्या भाषेतील सुभाषिते संग्रहित केली आहेत. श्री गणेश वंदना हा काव्यसंग्रह लेखिकेचा स्वरचित काव्यसंग्रह आहे. नवीन काव्य करणाऱ्या सर्व युवकांसाठी हे दोन्ही काव्यसंग्रह सोपानासारखे काम करतील असा विश्वास वाटतो.

**संस्कृत काव्य तरङ्गिणी**

प्रस्तुत काव्यसंग्रह कवियित्री सौ. आशा पांडे यांनी रचला आहे. या नवयुग विद्यालय नागपूर येथील सेवानिवृत्त शिक्षिका आहेत. त्यांची ६ मराठी, ३ हिंदी, १ उर्दू, १ इंग्लिश एवढी पुस्तके प्रकाशित आहे. त्यांनी ३ स्तोत्रांचे मराठी, हिंदी, भाषांतर केले आहे.

हा काव्यसंग्रह सौ. आशा पांडे यांनी निकिता प्रकाशन, नागपूर येथे २०१३ साली प्रकाशित केला. या काव्यसंग्रहात एकूण ३१ काव्यरचना आहेत. त्यामध्ये हिमालय, गंगा, शारदा, संस्कृतभाषा, केशव, गुरु, या सर्वांना नमन केले आहे. त्याचबरोबर काही काव्यरचनांमध्ये भारत मातेचा विषाद, वृद्धत्व, भृणहत्या हेही विषय मांडले आहेत.

**अभितः परितः**

डॉ. प्रज्ञा देशपांडे रचित हा स्फुटलेखनपर संग्रह आहे. डॉ. देशपांडे या रौप्य पदक विभूषित छात्रा आहेत. त्यांनी स्नातकोत्तर अभ्यासक्रमात सुवर्ण पदक प्राप्त केले आहे. हडस कनिष्ठ महाविद्यालयात महोदया संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांचे अध्यापन करतात. महोदयांची ७ पुस्तके प्रकाशित आहेत. त्यांना नुकतीच उत्तराखंडातील कुमाऊ विद्यापीठाने संस्कृत विषयातील डी.लिट्. ही सर्वोच्च उपाधी प्रदान केली आहे.

प्रस्तुत अभितः परितः हे पुस्तक २०१३ साली उज्जयिनी येथे साहित्य उत्सवात प्रकाशित झाले. याचे प्रकाशक श्री. रेणुका प्रकाशन, नागपूर हे आहेत.

यात कवयित्रीने दैनंदिन जीवनात येणाऱ्या अनुभवांचे शब्दात रूपांतर केलेले आहे. हे सर्व अनुभव आपल्यालाही दैनंदिन जीवनात अनुभूती देतात. हा संग्रह अतिशय साध्या आणि सोप्या भाषेत लिहिल्यामुळे वाचकाला निर्मळ आनंद प्राप्त होतो.

या लेखनसंग्रहाने संस्कृत साहित्यात मोलाची भर घातली आहे.

अशाप्रकारे नागपूरात विविध लघुकाव्ये आणि स्फुटरचना निर्माण झाल्या. या प्रत्येक काव्याचा आशय भिन्न आहे पण सर्वच काव्यांची भाषा अतिशय सरल, सुबोध आणि प्रासादिक आहे. ही सर्वच लघुकाव्ये छंदोबद्ध आहेत. यावरून आधुनिक संस्कृत कवींचे छंदावरील प्रभुत्व प्रकर्षाने जाणवते. यापैकी 'प्रहेलिका शतकतम्' या काव्यांचा अंतर्भाव जरी बालसाहित्यात होत असला तरी देखील स्फुटकाव्य संग्रह यादृष्टीने त्याचा अंतर्भाव येथे केलेला आहे. या सर्वच काव्यांनी संस्कृत सहित्यात मोलाची भर घातली आहे.

□□□



**प्रकरण चवथे**

# नाटके रूपके

महाकाव्ये आणि लघुकाव्ये यांच्याप्रमाणेच नाटक हा काव्यांचा एक उत्तम प्रकार आहे. 'काव्येषु नाटकं रम्यं' हे वचन विख्यात आहे. नाटकाला संस्कृतात रूपक अशी संज्ञा आहे. नाटक हे दृश्यकाव्य असून सर्व प्रकारच्या लोकांचे मनोरंजनाचे साधन आहे. म्हणूनच सर्वच भाषांमध्ये नाटक या काव्यप्रकाराला अतिशय लोकप्रियता प्राप्त झालेली आहे. नागपूरात महाकाव्य, लघुकाव्य, स्फुटरचना ह्यांच्यासोबतच नागपुरात काही नाटक रूपक तयार झाली.

## काव्यकण्ठोविजयते

हे रूपक डॉ. मधुसूदन पेन्ना यांनी रचले आहे. श्रीकाव्यकण्ठ गणपति मुनी (१८७८-१९३६) हे आंध्रचे मोठे संस्कृत विद्वान वेदपंडित योगी व सिद्ध पुरुष होते. त्यांनी आपल्या जीवनात काव्यकण्ठ ही उपाधी प्राप्त केली. शंभरच्यापेक्षा अधिक संस्कृत ग्रथांची रचना केली. स्वयं सिद्ध योगी असल्याने त्यांनी योग शास्त्राचे अनेक मार्मिक विषय स्वतःच्या ग्रंथामध्ये स्पष्ट केले. ते भगवान रमण महर्षीचे शिष्य होते. 'नवद्वीप' पंडित सभेत त्या सभेच्या अध्यक्ष गद्यकवी सार्वभौम असे विख्यात अंबिकादत्त व्यास ह्यांच्याशी काव्यकण्ठ गणपतिमुनीने केलेला संवाद अत्यंत रोचक आहे. श्लोकात्मक संवाद त्या काळात अत्यंत प्रसिद्ध होता. ह्या संवादावर आधारीत रूपक म्हणजे काव्यकण्ठोविजयते' हे होय. त्या संवादाने प्रेरणा घेवून कविने हे रूपक लिहिले आहे. ह्या रूपकात तीन दृश्य आहेत. सुमारे ५० श्लोकांमध्ये हे लघुरूपक लिहिलेले आहे.

२२ वर्षाचे तरुण गणपतिमुनी प्रवासात असतांना काशी येथून आंध्रप्रदेशाला जात असतांना बंगाल प्रदेशात असलेल्या 'नवद्वीप' प्रदेशात पंडित सभा बघण्यास गेले पण मोठ्या विद्वानांसाठी आमंत्रण असल्याने या लहान तरुण पंडिताला सभेत प्रवेश नाकारल्या गेला. तर दुसऱ्याच्या मदतीने सभा बघण्यास गणपतिमुनी सभेत

प्रविष्ट झाले. त्यानंतर मंचावर उपस्थित अंबिकादत्त व्यास ह्यांना बघून हे कोण आहेत असे त्यांनी विचारल्यावर माझ्या सारख्या विद्वानाला न ओळखणारा या सभेत कसा प्रवेश करू शकणार अशा भावनेने अंबिकादत्त व्यासांनी विचारल्यावर दोघांचाही संवाद सुरू झाला. हा संवाद श्लोकामध्ये येथे कवीने वर्णीला आहे. संवादाच्या शेवटी अकल्पित गणपतिमुनींची परीक्षा झाली आणि भारतातल्या सर्व श्रेष्ठ विद्वानांसमोर त्यांना 'काव्यकण्ठ' ही सर्वोत्कृष्ट उपाधी दिली गेली. हे रूपक ह्या घटनेवर आधारित आहेत.

विद्वच्चन्द्रकलापूर्ण सुहृत्ताराधिसेवितम्।
खलमेघगणोपतं भसतेऽदः सभानभः।।

इत्यादी ह्या रूपकाचे सुंदर उदाहरण आहे. हे गुंजारव पत्रिकेमध्ये सन २००३ मध्ये प्रकाशित झाले.

## नाट्यत्रिदलम् :

हा नाटकसंग्रह डॉ. सौ. स्मिता होटे ह्यांनी रचलेले आहे. सौ. स्मिता होटे ह्या नागपूर विश्वविद्यालयाच्या एम्.ए.एम्.फिल्.पी.एचडी (संस्कृत) ह्या पदवी धारणकर्त्या आहेत. त्या लेडी अमृताबाई डागा महाविद्यालय नागपूर येथून २०१९ साली विभाग प्रमुख म्हणून निवृत्त झाल्या आहेत. संस्कृत–अभ्यास मंडळ, कला शाखा, नागपूर विद्यापीठाच्या त्या सदस्या तसेच पूर्वाध्यक्षा होत्या. नागपूर विद्यापीठ तसेच कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यापीठात त्या. पी.एचडी मार्गदर्शिका आहेत. संस्कृत भाषा प्रचारिणी सभेच्या त्या उपाध्यक्षा आहेत. त्या संस्कृतच्या उत्तम प्रचारिका असून त्या नेहमी निःशुल्क संस्कृत संभाषण वर्गांचे आयोजन करीत असतात. त्यांचे लेख 'संस्कृत भवितव्यम्' ह्या साप्ताहिकातून प्रकाशित होत असतात. त्यांनी संपादित केलेली पुस्तके

१) भासकृत दूतघटोत्कचम्
२) बाणभट्टकृत शुकनासोपदेशः
३) देववाणीचे वरदान (डॉ. के.रा.जोशी गौरव ग्रंथ)
४) तर्कवीरदर्शन (डॉ. नी.र.वऱ्हाडपांडे गौरव ग्रंथ)

### प्रकाशित पुस्तके

१) वैदर्भीय कवी दत्तात्रेय येरकुंटवार, मंगेश प्रकाशन, नागपूर (मराठी)
२) इतस्ततः – संस्कृतभाषा प्रचारिणी सभा, नागपूर (संस्कृत लेखसंग्रह)



### नाटकांविषयी :

तमसो मा ज्योतिर्गमय ही एकांकिका आहे. ह्या एकांकिकेला अखिल भारतीय–संस्कृत–नाट्यलेखन स्पर्धेमध्ये पारितोषिक मिळालेले आहे. ह्या एकांकिकेत चार पात्र आहे. एकांकिकेचा विषय हा आजच्या दैनंदिन जीवनाशी निगडित आहे. भ्रष्टाचाराला विरोध करून भ्रष्टाचार संपविण्यासाठी पुढे सरसावलेला एक तरुण लेखिकेने येथे खूप सहज आणि उत्तमरित्या वर्णिला आहे. स्वतःच्या बहिणीने आणलेला उपजीविकेचा आणि विवाहाचा प्रस्ताव भ्रष्टाचारयुक्त असल्याकारणाने हा तरुण त्याला कसा आणि का नाकारतो हे या नाटकात आलेले आहे.

नाटकाची भाषा अगदी साधी, सोपी आणि सरळ आहे. सामान्य माणसालाही वाचताच उलगडणारी आहे. नाटकाचा विषय हा भ्रष्टाचार असल्याने लेखिका सामाजिक परिस्थितीच्या उत्तम जाणकार आहेत हे प्रकर्षाने जाणवते. तसेच आई–मुलाचा संवाद आणि मोबाईलवरील बहिण–भावाचा संवाद ज्या सहजतेने येथे लेखिकेने मांडला आहे, त्यावरून लेखिका ह्या आजच्या पिढीशी एकरूप झाल्या आहेत असे दिसून यते. संस्कृत सारख्या देववाणीतून आजच्या युगातील भ्रष्टाचारासारख्या विषयाला मांडण्याचा लेखिकेचा प्रयत्न निश्चितच स्तुत्य आहे.

भाग्यरेखा कन्या या नाटिकेचा विषय स्त्रीभृण हत्या हा असून या गंभीर समस्येने ग्रस्त भारतीय समाज आणि त्या समाजाला कन्येचं महत्त्व सांगणारी ही नाटिका आहे.

शेवटची नाटिका रामायणकथा आश्रित आहे. श्री रामपुरुष सुद्धा दैवाला पार करू शकत नाही. म्हणून दैवगती ही निराळीच असते हे सत्यच आहे. अशाच प्रकारे दशरथासारखे पुत्रशोकात दिवंगत पावणाऱ्या एका वडिलांची कथा विषमा दैवगतिः या नाटिकेत डॉ. स्मिता कोटे यांनी अतिशय सुंदररित्या गुंफिली आहे.

## रसाविष्कार :

''रसाविष्कारः'' हा संस्कृतनाट्यसंग्रह प्रा. डॉ. विभा क्षीरसागर ह्यांच्या प्रतिभेचा उत्कृष्ट नमुना आहे. ह्याचे प्रकाशक कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय आहेत. नाट्यसंग्रहाचा अक्षरविन्यास सतीश ठेंगडी ह्यांचा आहे. 'रसाविष्कारः' हा नाट्यसंगह १५ जानेवारी २०१६ साली प्रकाशित झाला.

'रसाविष्कारः' ह्या नाट्यसंग्रहात एकूण सात नाटके आहेत. 'जागर्या' ह्या नाटकाचा विषय आधुनिक आहे. Live in Relationship हा पाश्चात्य संस्कृतीचा

भाग ह्यात रेखाटला आहे. ‘आश्चर्यकरमेव’ ह्या द्वितीय नाट्यकुसुमात समाजातील विविध अपराधांवर प्रकाश पडला आहे. ‘जोडयिता’ ह्या तिसऱ्या नाटकात संगणकाच्या आणि Social Networking च्या चांगल्या व वाईट विषयांचे मंथन केल्या गेले आहे. अविरत प्रयत्नांनी आपण सर्वकाही प्राप्त करू शकतो हा ‘सिकतासु तैलम्’ ह्या चवथ्या नाटकाचा संदेश आहे. ‘नमो देव्यै’ ह्या पाचव्या नाटकात विवाहानंतर युवतींच्या जीवनात येणारे क्लेष सहजतेने दाखविले आहेत. ‘गुरुदक्षिणा’ ह्या सहाव्या नाटकात आई-वडील ह्यांच्यातील अनादराने आणि स्वार्थाने अपत्यांवर कशी दुस्थिती येते हे दर्शविले आहे. ‘हे मनः’ ह्या नाटकात रूपा ह्या विद्यार्थीनीच्या जीवनपटलात येणाऱ्या भौतिक आकर्षणांचे कपट नाटककर्तीने रंगविले आहे.

ह्या सर्व नाट्यकृती अतिशय आकर्षक आहेत. रंगभूमीवर प्रयोगार्ह आहेत. सर्वच नाटकांचे विषय आधुनिक असल्या कारणाने ते रसिक वाचकाला बांधून ठेवतात. नाटककर्तीची भाषा अतिशय साधी, सोपी आहे. कुठे कुठे सुभाषितांचे प्राचुर्य दृष्टीपथास येते.

□□□



प्रकरण पाचवे

# कथासाहित्य

संस्कृतात कथांचा वारसा पूर्वापार चालत आलेला आहे. अगदी सुरुवातीला वैदिककथा, पौराणिक कथा, त्यानंतर रामायण, महाभारत ह्यांच्यातील कथा, बालसाहित्यासाठी पंचतंत्र तथा हितोपदेश ह्यांच्यासारख्या कथांचा वारसा संस्कृत भाषेला लागलेला आहे.

गेल्या शतकात पंडिता क्षमाराव ह्यांच्या कथा अतिशय लोकप्रिय होत्या. त्या त्यांच्या कथांमध्ये तत्कालीन सामाजिक परिस्थितीशी निगडित असलेलेच विषय मांडत होत्या. आजच्या काळात देखील अनेक लेखक लेखिका हा कथांचा वारसा पुढे चालविण्यासाठी सरसावले आहेत.

आपल्या नागपुरात कथालेखनाचे हे कार्य झपाट्याने सुरु आहे. प्रा. दुर्गा पारखी ह्यांचा ‘सुमनस्सौरभम्’ हा कथासंग्रह प्रकाशित आहे, तर डॉ. विभा क्षीरसागर ह्यांचा ‘कथापाथेयम्’ हा कथासंग्रह वाचकांना उपलब्ध आहे. डॉ. संध्या गाडगे यांचे पाच कथासंग्रह प्रकाशित आहेत. १) कथामृतम् २) कथारत्नावली ३) नवकथाः ४) शारदीयम् ५) बालकथातरंगीनी.
स्थानिक ‘संस्कृत भवितव्यम्’ मधून देखील अनेक कथा प्रकाशित होत असतात. त्यामध्ये डॉ. लीना रस्तोगी, डॉ. मंजुषा चन्ने, प्रा. वीणा गानू, डॉ. हंसश्री मराठे, प्रा. दुर्गा पारखी ह्यांच्या कथा उल्लेखनिय आहेत.

२००१ ते २०१९ ह्या काळात नागपुरात खालील कथासंग्रह प्रकाशित झाले.

| | |
|---|---|
| १. कथासुमनस्सौरभम् | प्रा. सौ. दुर्गा पारखी |
| २. कथामृतम् | डॉ. शारदा गाडगे |
| ३. कथारत्नावली | डॉ. शारदा गाडगे |
| ४. शारदीयम् | डॉ. शारदा गाडगे |

५. नवकथाः डॉ. शारदा गाडगे
६. कथापुष्पावली डॉ. शारदा गाडगे
७. जागरा डॉ. विभा क्षीरसागर
८. कथापाथेयम् डॉ. विभा क्षीरसागर

**कथासुमनसौरभम् :**

हा कथासंग्रह सौ. दुर्गा पारखी ह्यांनी लिहिलेला आहे. सौ. दुर्गा पारखी ह्यांनी हा कथासंग्रह त्यांचे वडील व आजी-आजोबा ह्यांना अर्पण केला आहे. कथासंग्रहाच्या मुखपृष्ठावर फुलाचे चित्र आहे तर पृष्ठभागावर लेखिकेचा स्वतःचा परिचय दिलेला आहे.

लेखिका सेवानिवृत्त शिक्षिका आहेत. नागपूर विद्यापीठाची वाङ्मय पारङ्गत परीक्षा त्यांनी प्रथम क्रमांकांनी उत्तीर्ण केलेली आहे. त्या नागपूर तसेच कालिदास-संस्कृत विद्यापीठाशी देखील संबंधित आहेत. संस्कृत संभाषण वर्ग देखील त्या चालवितात. ह्या कथासंग्रहाचे प्रकाशक संस्कृत-भाषा प्रचारिणी सभा, नागपूर आहेत. मुखपृष्ठ सतीश ठेंगडी ह्यांनी केलेले असून सङ्गणकीय सहाय्य मुक्ता ठेंगडी ह्यांनी केले आहे. ह्याचे प्रकाशन बंगलोर येथे विश्वसंस्कृत मेळ्यात जानेवारी २०११ मध्ये झाले.

ह्या कथासंग्रहात एकूण ११ कथा आहेत. एकूण ४४ पृष्ठे असलेल्या ह्या कथासंग्रहातील प्रत्येक कथा ही वेगळ्या विषयाला धरून आणि अगदी सोप्या भाषेत आहे. रूपवर्णानी भिन्न असल्या कारणानी त्या चित्ताकर्षक आहेत. कुसुमावचयाच्या प्रसंगी फुलाहुनही कोमल हृदय तर कुठे मुलासाठी वधूसंशोधन करणाऱ्या आईचे प्रगल्भ मन येथे वर्णिले आहे. हुमंताप्रमाणे भक्ति करावी असा संदेशही आहे, तर कुठे पश्चातापात दग्ध मनही आहे.

एकूणच सगळ्या कथा अतिशय सुंदर आहेत. भाषा सरळ सोपी आहे. कुठे-कुठे संभाषणेही आहेत. लेखिकेला अलंकारांचा हव्यास कुठेही नाही. ते परिचय, प्रदीर्घ वर्णने लांबलचक वाक्ये, मोठ-मोठे समास कुठेही नाही. लेखिकेची निरीक्षण शक्ती अत्यंत सूक्ष्म आहे आणि संस्कृत भाषेवर त्यांचे विलक्षण प्रभुत्व आहे. हे प्रस्तुत कथासंग्रह वाचतांना प्रकर्षाने जाणवते.



**कथामृतम् :**

हे पुस्तक डॉ. शारदा रमेश गाडगे यांनी लिहिलेले आहे. डॉ. शारदा रमेश गाडगे ह्या मुळच्या नागपुरच्या आहेत. त्यांचा जन्म ३० जून १९५४ साली झाला. त्यांनी नागपूर विद्यापीठाची पी.एच.डी (संस्कृत) ही उपाधी मिळविलेली आहे. त्या लेडी अमृताबाई डागा महाविद्यालयात गेली ३५ वर्षे कार्यरत असून संस्कृत विभागाध्यक्ष पदाची धुरा सांभाळून महोदया २०१४ साली निवृत्त झाल्या. त्यांचा संस्कृत प्रचार आणि प्रसारासाठी संस्कृत भाषा प्रचारिणी सभेकडून गौरव देखील करण्यात आलेला आहे. त्यांचे नागपूर विद्यापीठ तसेच कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यापीठात विविध प्राधीकरण सदस्यत्व देखील आहे. त्यांचे प्रकाशित ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत.

१) संस्कृत साहित्यातील सुभाषितांचे चिकित्सक अध्ययन २००३
२) कथामृतम् २००९
३) बालकथा तरङ्गिणी २०११
४) कथारत्नावली २०११
५) नवकथाः २०१३
६) शारदीयम् २०१३
७) ज्ञानेश्वरी आपके लिये (हिंदी अनुवाद)
८) कथापुष्पावली २०१७
९) नवकथाः २०१३

त्यांनी शुकनासोपदेश २००५ ह्या पुस्तकांचे अनुवादासह संपादन देखील केलेले आहे.

'कथामृतम्' हे पुस्तक २००९ साली संस्कृत-भाषा प्रचारी सभा ह्यांच्यामार्फत प्रकाशित झालेले असून ह्या पुस्तकाला एकूण ४६ पाने आहेत. ह्यात एकूण १२ कथा आहेत. ह्याचे मुखपृष्ठ अनिवाश फाईन आर्टस् ह्यांनी रेखाटले आहे. पुस्तकाच्या सुरुवातीला डॉ. के. रा. जोशी ह्यांचा शुभाशिर्वाद आहे. ह्यातील सर्व कथांचा विषय हा आपल्या जीवनाशी निगडित असलेल्या गोष्टींचा अथवा आपल्या आजुबाजुला घडणाऱ्या गोष्टींचा आहे.

१) **नियतिः एव बलीयसी :**

ह्या कथेत एका माणसाच्या बँकेचे दिवाळे निघाल्यामुळे आपल्या आयुष्यभराची मिळकत गमावल्याची दुःखद गोष्ट आहे.

२) **आशाबन्ध :**

ह्या कथेत सागरी वादळात संपूर्ण कुटुंबाला गमावलेली स्त्री कशी एका लहान बाळाला जे त्याच वादळाचे पिडित असते त्याला अधार देते ह्याची गोष्ट आहे.

३) **आधार :**

ह्या कथेत एक असहाय तरुणीची गोष्ट आहे.

४) **यशोमर्म :**

ह्या कथेत एका अपघाताने ग्रासलेला परंतु नंतर स्वबळावर महापौर झालेल्या युवकाची गोष्ट आहे.

५) **धन्यऽसि :**

कथेत सुस्वभावी, शांत परंतु स्वावलंबी आणि धैर्यवान शेतकऱ्याच्या पत्नीची गोष्ट आहे.

६) **परिवर्तनम् :**

ह्या कथेत परिस्थितीने एका युवकात घडवून आणलेले परिवर्तन आहे.

७) **सफल मे मातृत्वम् :**

ह्या कथेत एका स्त्रीचे वडील आणि नवरा भ्रष्टाचारी असून मुलगा मात्र चांगला व्यक्ती बनतो ह्याबद्दलचा तिचा आनंद ह्यात आलेला आहे.

८) **मनीषा :**

ही कथा फारच ह्रदयाला स्पर्श करणारी आहे. त्सुनामीमध्ये वेगळे झालेले पती पत्नी आणि त्यात मरण पावलेल्या पत्नी अंतीम इच्छा यात आली आहे.

९) **कन्या परकीय एव :**

ह्या कथेत एका विवाहित मुलीची मनःस्थिती वर्णिली आहे.

१०) **देवीमाता :**

ह्या कथेत लोक एका उन्मत्त मुलीला देवमाता बनवतात ह्याची गोष्ट आहे.

११) **उपेक्षित :**

ह्या कथेत एक होतकरू परंतु दुर्भाग्याने स्वतःच्या लोकांकडून उपेक्षित असलेल्या मुलाची कथा आलेली आहे.



१२) **अहो श्रेष्ठत्वं व्यवहारस्य :**

ह्या कथेत एका वृद्ध माणसाची आणि त्याच्या मोठेपणाची गोष्ट आहे.

## कथारत्नावली २०११

ह्या पुस्तकाला एकूण ४० पानं आहेत. ह्याचे प्रकाशक संस्कृतभाषा प्रचारिणी सभा, नागपूर आहेत. ह्याचे मुखपृष्ठ सौ. शर्वरी गाडगे ह्यांनी केले आहे. ह्यात १२ कथा आहेत.

१) **पितृहृदयम् :**

ह्यात अगतिक पित्याचे मोठे हृदय ह्याबद्दलची कथा आहे.

२) **तृष्णा :**

ही एका अनाथ माणसाची जनसंपर्काच्या तृष्णेची कथा आहे.

३) **समाजनम् :**

ह्यात एका धैर्यवान महिलेची कथा आहे. ती आपल्या पतीच्या अपंगत्वावर मात करून कसे जीवन पुढे नेते त्याची कथा आहे.

४) **नवीन दृष्टि :**

ह्यात मुंबई सारख्या शहरात बसणाऱ्या एका कुटुंबाची आणि एका वृद्धाची कथा आहे.

५) **जीवनप्रवाह :**

ह्यात आईवडिलांचे आपल्या अपत्यावर टाकलेले ओझे वर्णिले आहे आणि त्याचे दुष्परिणाम देखील आलेले आहेत.

६) **संस्कारेषु परिवर्तनम् आवश्यकम् :**

ह्यात ब्रह्मदेवाची तपस्या करणारी तरुणी आणि त्यांनी दिलेला आशीर्वाद आला आहे.

७) **अनुकरणशील स्वानन्द :**

ह्यात लहान मुलाच्या द्वारे मोठ्यांना सुद्बुद्धी कशी मिळाली ही कथा आलेली आहे.

८) **जागृति :**

ह्या कथेत एका शिक्षिकेची कहाणी आहे. ज्यात ती स्वतःला कालानुरुप बदलवण्याचा प्रयत्न करते आणि तो बदल कोणीच स्वीकारत नाही.

९) **पश्चाताप** :

ह्या कथेची कथावस्तु तत्कालीन महाविद्यालयीन मुले रस्त्यावरील सगळ्यांच्या मोटारींच्या कसे काचा फोडतात आणि त्यात एक निरागस मुलगा कसा फसतो ही आहे.

१०) **परितोष**

ही कथा सैन्यातील एक जवान आणि त्याचा मित्र ह्यांची आहे.

११) **महिला दिवस**

ह्या कथेची कथावस्तु एका महिलेभोवती फिरते. त्यात ही महिला नोकरी करणारी, कर्तव्यदक्ष परंतु घरच्यांकडून उपेक्षिलेली अशी दाखविली आहे.

१२) **मैत्रम** :

ही दोन मित्रांच्या घनिष्ट मैत्रीची कथा आहे.

## नवकथा :

ह्या कथा संग्रहाच्या लेखिका डॉ. शारदा गाडगे आहेत. हा कथा संग्रह २०१३ साली संस्कृतसाहित्योत्सवः उज्जयिनी येथे पुस्तकरूपाने प्रकाशित झाला. ह्याचे प्रकाशक सौ. रेणू हरसुलकर, रेणुका प्रकाशन, नागपूर हे आहेत. मुखपृष्ठ सौ. शर्वरी गाडगे ह्यांनी केले आहे. लेखिकेने हा कथासंग्रह त्यांच्या परमपूज्य सासऱ्यांना म्हणजेच वैद्य रामभाऊ जगन्नाथ गाडगे ह्यांना समर्पित केला आहे.

ह्या कथा संग्रहात एकूण ९ कथा आहेत. रामायण, महाभारत यातील प्राचीन कथांमधील प्रसद्धि पात्र डोळ्यांसमोर ठेऊन 'नवकथाः' ह्या कथा संग्रहातील सर्व कथा रचल्या गेल्या आहेत. जसे त्याकाळी सावित्री, कर्ण, शबरी, भरत, श्रवणकुमार आपल्या गुणवैशिष्ट्यांनी नावलौकिकात आले होते. त्याचप्रमाणे आधुनिक काळातील गुणवैशिष्ट्यांनी युक्त ह्या सर्व पात्रांना घेऊन लेखिकेने कथा रचल्या आहेत. भरत ह्या कथेत दोन भावांचे प्रेम दर्शविले आहे. भीष्म ह्या कथेत लहान भावासाठी मोठ्या भावाने केलेला त्याग वर्णिला आहे. सावित्री ह्या कथेत आधुनिक काळातील सावित्री रेखाटली आहे. एकलव्य ह्या कथेत जिद्दीने समोर जाणारी मुलगी तर कर्ण ह्या कथेत उपेक्षित मुलाने पार पाडलेल्या त्याच्या कर्तव्याची परिपूर्णता आली आहे. यशोदा, श्रीकृष्ण, शबरी, श्रवणकुमार ह्या कथांमध्ये अनुक्रमे आधुनिक काळातील यशोदा, कृष्ण, शबरी, श्रवणकुमार रेखाटले आहेत. ह्या कथासंग्रहाचे शीर्षक श्लेषात्मक आहे. ह्यातील कथांची संख्या ९ आहे. त्याचप्रमाणे प्राचीन काळांतील पात्रे नवीन रूपात लेखिकेने वर्णिली आहेत.

## कथापुष्पावली :

ह्या कथासंग्रहाच्या लेखिका डॉ. शारदा गाडगे आहेत. हा कथासंग्रह २०१७ साली प्रकाशित झाला. ह्याचे प्रकाशक संस्कृत भाषा प्रचारिणी सभा, नागपूर हे आहेत.

ह्या कथासंग्रहात एकूण १० कथा आहेत. ह्यातील चिन्तामुक्तिः, धन्यं मातृत्वं, अहो! महिला सन्मानः!, अहो महिला दिवसः! ह्या कथांमधून स्त्री-सम्मान, स्त्रीशक्ती हे विषय मांडले आहेत. उर्वरित सगळ्या कथांचे विषय हे आजच्या काळाशी निगडित आहेत.

## शारदीयम् :

ह्या कथासंग्रहाच्या लेखिका डॉ. शारदा गाडगे आहेत. हा कथासंग्रह २०१३ साली संस्कृत साहित्योत्सवः, उज्जयिनी येथे प्रकाशित झाला. ह्याचे प्रकाशक रेणुका प्रकाशन, नागपूर हे आहेत. मुखपृष्ठ सौ. शर्वरी गाडगे ह्यांनी केले आहे.

ह्या कथासंग्रहात एकूण १३ कथांचा समावेश आहे. विवाहाशिवाय सहजीवन जगण्याच्या इच्छेने झालेला दीपिकेचा अनुताप, अविचार ह्या कथेत आला आहे. कुसंगतीने निरपराध निनादच्या आयुष्यात उद्भवलेली दारूण अवस्था 'आत्मदोषः दुःख' ह्या कथेत आली आहे. निरपेक्षः पुनर्मेलनम्, पुनर्जन्म ह्या तीनही कथांमध्ये विविध भावांनी युक्त पुरुषमनातील विद्यमान कोमलभावना प्रकटिल्या आहेत. नतर काही कथांमधील विषय वाचकांना दुसऱ्याच भावविश्वात रमवतात तर कुठे कथेमध्ये भगिनी प्रेम प्रकट होते.

विविध विषयांनी युक्त असलेल्या ह्या सर्व कथा अतिशय मनोहारी आहेत. एकूणच ह्या सर्व कथा आजच्या समाजाला धरून आहेत. सगळ्याच कथांचे विषय आजच्या सामाजिक परिस्थितीशी निगडित आहेत. ह्यावरून लेखिकेची निरीक्षण दृष्टी विलक्षणीय आहे असे कळते. लेखिकेची भाषा अतिशय सोपी आहे. भाषेमध्ये कुठेही काठिण्य नाही. सरल आणि सुबोध वाक्ये ही लेखिकेची वैशिष्ट्यता आहे. अगदी सामान्य माणसालाही पुस्तक हातात घेतल्यावर वाचून समजेल इतक्या सोप्या भाषेत लेखिकेने सगळ्या कथा रचल्या आहेत. कथांवरून लेखिकेचा स्वभाव देखील

स्पष्ट होतो. लेखिकेला उगाचच पाल्हाळ लावायला आवडत नाही. त्या प्रत्यक्ष विषयाला प्राधान्य देतात. कथा वाचन सुरू केल्यानंतर कथेच्या अंताची ओढ लागते इतकी पकड प्रत्येक कथेत लेखिकेने ठेवली आहे. लेखिकेचा हा प्रयत्न शिरोधार्य आहे. संस्कृत साहित्यात ह्याने मोलाची भर पडली आहे. संस्कृत साहित्याला अशा प्रकारच्या लेखिका प्राप्त होणे हे देवाचं लेणं म्हणावं.

## कथापाथेयम्

हा कथासंग्रह डॉ. विभा क्षीरसागर ह्यांनी लिहिलेला आहे. प्रा. क्षीरसागरांनी हा कथासंग्रह त्यांचे गुरु आणि आई-वडील ह्यांना समर्पित केला आहे. ह्याचे प्रकाशक डॉ. पंकज चांदे 'कुलगुरु', 'कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक हे आहेत. ह्याचे प्रकाशन विश्व संस्कृत पुस्तकमेला, बंगलोर येथे २०११ ला झाले.

महोदयांनी संस्कृत साहित्यातील पर्यावरण ह्या विषयात आचार्य उपाधी प्राप्त केली आहे. सी.पी.ॲन्ड बेरार महाविद्यालयामध्ये संस्कृत विभागाध्यक्ष आहेत.

ह्या कथासंग्रहात एकूण १३ कथा आहेत. ह्या कथासंग्रहामध्ये कथांमध्ये लेखिकेने स्त्रीशिक्षण, स्त्री भ्रूणहत्या इत्यादी स्त्री समस्यांचे वर्णनच नाही तर त्यांच्या निवारणाचे उपाय देखील सांगितले आहेत. 'तृप्ति' ह्या कथेमध्ये गावात राहणारी तृप्ति परंपरेचे उल्लंघन करून दिल्लीला जावून भूमिजलज्ञ होते आणि संक्रमणाच्या दिवशी ग्रामवासीयांची जलसमस्या सोडविते. 'शीलं परं भूषणं' ह्या कथेत स्वःचे जीवन उध्वस्त झालेली नायिका महिला वसतिगृहाची संचालिका होवून पथभ्रष्ट युवतींना शीलरक्षण शिकविते. स्त्रियांचे मनोबल वाढविणाऱ्या नायिका येथे लेखिकेने वर्णिलेल्या आहेत.

सुबोध सरळ भाषिक ह्या कथा आहेत. लेखिकेची सुभाषितांमधील रुचि कथांमध्ये दिसते. सुप्रसिद्ध सुभाषिते वेगवेगळ्या ठिकाणी लेखिकेने पेरलेली आहेत. सर्व कथा उद्‌बोधक आहेत.

ह्या सर्वच कथा अतिशय सुबोध आहेत. त्या आपल्या दैनंदिन जीवनाशी संबंधित असल्यामुळे वाचकांना जवळच्या वाटतात. लोकांमध्ये संस्कृत वाचनाची आवड वाढविण्याच्या दृष्टीने हे सर्वच कथासंग्रह अत्यंत उपयोगी आहेत.



## जागरा :

जागरा ह्या संस्कृत लघुकथासंग्रहाच्या प्रणेत्या डॉ. विभा क्षीरसागर महोदया आहेत. हा लघुकथासंग्रह २०१६ साली कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय ह्यांच्या मार्फत प्रकाशित झाला.

जागरा ह्या लघुकथासंग्रहात एकूण १५ कथा आहेत. ह्या सर्वच कथांमध्ये २१ व्या शतकाच्या सामाजिक परिस्थितीचे प्रतिबिंब दिसते.

विद्यार्थ्यांनी स्वतःच्या अपयशाचे दोषारोपण शिक्षकांवर करू नये असा संदेश देणारी 'जागर्या' ही प्रथम कथा आहे. विवाहबाह्य सहनिवास ह्या सद्यकालीन विषयाला स्पर्श करणारी 'शतानन्दः' ही कथा आहे. परधन लोभापासून वाचकांना दूर करणारी 'मा गृधः कस्यतद्धनम्' कथा आहे. 'चञ्चला' ह्या कथेचा विषय नावाप्रमाणे प्रत्येक घरात आढळणाऱ्या चञ्चलतेवर आहे. पर्यावरणरक्षणाचा संदेश देणारी 'चिरंजीवी' ही कथा आहे. आभा या नायिकेची व्यथा तर कार्तज्ञभाव वाहून नेणाऱ्या नायकाची कथा अनुक्रमे 'अपेक्षा' आणि 'दैवतम्' ह्या दोन कथांमध्ये आली आहे. स्वेच्छेनुसार अध्ययनाची संधी प्राप्त झालेली 'रुचिः' ही कथा पाठकांना आनंदित करते. 'को मे दोषः' आणि 'अमूल्योऽर्धनिचोलः' ह्या दोन्ही कथा वाचनीय आहेत. 'इत्थं दहति चापलम्' ही कथा युवतींसाठी मार्गदर्शक आहे. 'ईश्वरेच्छा बलीयसी' ही कथा दैववाद प्रकट करते. 'वन्दे मातरम्' ही कौटुंबिक कथा आहे. 'बुद्धिः कर्मानुसारिणी' ही अंतिम कथा अतिशय रमणीय आहे.

सूक्ष्मनिरीक्षणाचा आविष्कार असणाऱ्या ह्या कथा विविध सामाजिक विषयांना स्पर्श करतात. लेखिकेची भाषा सरल, सुगम आहे. भाषेत कुठेही क्लिष्टता, दुर्बोधता आढळत नाही. ह्या कथासंग्रहातील प्रत्येक कथा पाठकाला उपदेश करते असे प्रकर्षाने जाणवते. म्हणून उपदेशपरता ह्या कथासंग्रहाचा विशेष आहे. लेखिकेने वेदवचन, श्लोक, सुभाषित सर्वत्र उद्‌धृत केली आहेत.

## मुष्ट्यामेव एव अस्ति अमरत्वम्

प्रस्तुत कथा संग्रह डॉ. हेमा गोखले यांच्याद्वारे २०१३ साली उज्जयनित प्रकाशित झाला. याचे प्रकाशक मनोविकास प्रकाशक, पुणे हे आहेत.

डॉ. हेमा गोखले याा नागपूरमधील संस्कृतानुरागी लोकांना सुपरिचित असलेलं व्यक्तिमत्व आहे. महोदया फक्त बिंझाणी महाविद्यालयातील संस्कृत विभागाध्यक्षाच

नव्हत्या तर नागपूर विद्यापीठातील अभ्यास मंडळाच्या अध्यक्षाही होत्या. यापूर्वी त्यांची ६ पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

प्रस्तुत 'मुष्ट्यामेव एव अस्ति अमरत्वम्' या कथा संग्रहात एकूण १८ कथा आहेत. या सर्व कथा उद्‌बोधनपर आहेत. सहसा विदधित न क्रियाम्, अतिविश्वासो न कर्तव्यः, हितं मितं च बुर्यात्, क्षमा एव उचितः या कथांच्या नावांवरून लेखिकेची चिंतनदृष्टी आपल्या दृष्टीस पडते.

सहसा विदधित न क्रियाम् नावाच्या कथेत लेखिकेने मानवतेचा संदेश दिलेला आहे. अतिविश्वासो न कर्तव्यः या कथेत मनुष्याचे प्रयत्न कसे स्वतःच्या लाभासाठी असतात हे सांगितलेले आहे. उत्तराधिकारी कः?, परीक्षा या दोन्ही कथांमध्ये लेखिकेने सेवाभावाचे महात्म्य प्रतिपादित केले आहे. कुसङ्गतिः परिहर्तव्या ह्याचा बोध युधिष्ठिरस्य धर्मसंकल्पना या कथेतून होतो. दिलीपाच्या कर्तव्यनिष्ठेचा अनुभव दिलीपस्य कर्तव्यनिष्ठाः या कथेतून होतो. स्वामीनिष्ठा या कथेतून वीररसाचा परिपोष होतो. अप्रत्यक्ष उपदेहश श्रेष्ठ भक्तह या दोन्ही संदेशपर कथा आहेत.

या सगळ्याच कथा अतिशय वाचनीय आहेत. कथा रचताना लेखिकेने हास्यरसाला सुद्धा दुर्लक्षित केलेले नाही.

प्रस्तुत कथासंग्रह तरुणांसाठी अतिशय लाभकारी आहे. येणाऱ्या काळात संस्कृत छात्रांची पठणपीपासा वाढविणाऱ्या आणि शमविणाऱ्या या सर्व कथा डॉ. हेमा गोखले यांनी रचून सरस्वतीचा गाभारा समृद्ध केला आहे.

□□□



### प्रकरण सहावे

# बालसाहित्य

संस्कृत साहित्य प्रौढांच्या मनोरंजनासाठी निर्माण झाले तसेच ते लहान मुलांसाठी देखील आहे. हे बालसाहित्य बालकांच्या मनावर उत्तम संस्कार करण्यासाठी अत्यंत मोलाचे आहे. या दृष्टीने प्रयत्न करून नागपुराने संस्कृत बालसाहित्यात अनमोल अशी भर घातली आहे.

रामटेक येथील कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाने बालसाहित्याचा २३ पुस्तकांचा एक संचा प्रकाशित केला आहे. ह्या संचामध्ये खालील पुस्तके आहेत.

**बालसाहित्य**

१) देवमानवः
२) स्वातंत्र्यवीराः
३) राजकीय महापुरुष : भाग-१
४) महर्षिवर्याः
५) त्यागधनाः
६) समाजोद्धारकाः
७) आध्यात्मिक महापुरुषाः
८) सत्पुरुषाः
९) राजवर्याः
१०) बालरत्नानि
११) शिक्षणमहर्षयः
१२) योगिवर्याः
१३) विशिष्ट महिलाः
१४) महाकवयः
१५) प्रसिद्धाः वैज्ञानिकाः
१६) वणिग्वराः
१७) कलाविदः
१८) शास्त्रवर्याः
१९) राजकीय महापुरुषाः
२०) आधुनिक राजकीय नेतार : भाग-१
२१) चिरंजीविनः
२२) क्रीडानिपुणाः
२३) आधुनिक राजकीय नेतार : भाग-२
२४) बालकथातरङ्गिणी
२५) रम्या रामायणी कथा
२६) बालकथापुष्पाहारः
२७) संस्कृतबालनाट्य संवाद मञ्जूषा
२८) बालनाट्यवल्लरी
२९) परिव्राजकत्रयम्

१ ते २३ ह्या पुस्तकांचे प्रकाशक तत्कालीन कुलगुरु मा. डॉ. पंकज चांदे आणि ह्याचे संपादक मंडळ : १) डॉ. मधुसूदन पेन्ना, २) डॉ. लीना रस्तोगी, ३) सौ. वीणा गानू, ४) डॉ. नंदा पुरी, ५) डॉ. सी.जी.विजयकुमार, ६) डॉ. कविता होले, ७) डॉ. वैभव कान्हे, ८) डॉ. हरेकृष्ण अगस्ती, ९) डॉ. मंजुषा चन्ने १०) डॉ. कलापिनी राणे असे आहे.

**१) देवमानव :**

ह्या पुस्तकाला एकूण १४० पृष्ठे आहेत. पुस्तकाच्या मुखपृष्ठावर भगवान गौतम बुद्ध, भगवान महावीर, जगदगुरु आदि शंकराचार्य, परमगुरु गुरुनानक, स्वामी दयानंद ह्यांचे रंगीत चित्र दिले आहे. तसेच प्रत्येक देवमानवाबद्दल सांगण्याच्या आधी त्यांचे रंगीत चित्र सुरुवातीला देवून नंतर त्यांच्याबद्दलची माहिती देण्यात आली आहे.

भगवान गौतम बुद्धांच्या आईला झालेला स्वप्नदृष्टांत, त्यानंतर तंचा राजपुत्राचा जन्म, नवावतार, त्यांचा विद्याभ्यास, यशोधरास्वयंवर, पहिले दुःख दर्शन, पुत्रजन्म, अभिनिष्क्रमण, सत्यान्वेषण यात्रा, संबोध, आर्यसत्य, बुद्धाचा आदेश, शिष्यपरिवार, पंचशील आणि महाप्रस्थान ह्यांच्याबद्दल सविस्तर माहिती दिली आहे.

महावीरांबद्दल लिहितांना त्यांचा काळ, महावीर नाव अद्भुतप्रज्ञ वर्धमान, तपस्या, कणिनियम, अहिंसामूर्ति, कृपालू, जैनमतसार, ह्यांच्याबद्दल सविस्तर सांगितले आहे.

जगद्गुरु आदिशंकराचार्यांचा दिव्यजन्म, शिवगुरुंना पुत्रप्राप्ती, असामान्य प्रज्ञा, कनकधारास्तोत्र, वैराग्य, संन्यास ग्रहण, परिव्रजन, काशीगमन, प्रथमशिष्य सनन्द, तोटकाचार्य, हस्तामकाचार्य, अद्वैत-मत-प्रचार, शंकराचार्य आणि मण्डनमिश्र ह्यांचा वाद, नरसिंह साक्षात्कार, धर्मयात्रा, आईचा अनितकाळ, दिग्विजययात्रा, काश्मीर यात्रा, मठस्थापना, कैवल्य प्रस्थान, ह्यांच्याबद्दल विस्तृत माहिती दिली आहे.

त्यानंतर सिख्ख महात्मा श्रीगुरुनानक ह्यांचा जन्म वृत्तांत, बालनानक, नानकांचे गृहस्थाश्रम, नानकांचा नवाब नावाचा अनुयायी, नानकांचे देशभ्रमण, फकीरीच्या अहंकाराचा मोड, नानक खलिफा वार्तालाप, ह्याबद्दल दिले आहे.

आर्यसमाज संपादक दयानंद सरस्वती ह्यांचा जन्म, विद्याभ्यास, वैराग्याचे बीज, महानिष्क्रमण, घोर तप, परं वैराग्य, लक्षापासून विचलित न होणे, गुरुचा



लाभ, गुरुशिष्याचे मिलन, काशी अनुभव, आर्यसमाज, देहत्याग ह्यांच्याबद्दल दिलेले आहे.

**२) स्वातंत्र्यवीरा :**

ह्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर राणी-लक्ष्मीबाई, भगतसिंह, नेताजी सुभाषचंद्र बोस, सरदार उधमसिंह, वासुदेव बळवंत फडके ह्या सगळ्या स्वातंत्र्यवीरांची चित्रे आहेत. ह्या पुस्तकाला एकूण १४४ पृष्ठे आहेत. ह्या पुस्तकात प्रत्येक स्वातंत्र्यवीराबद्दल लिहिण्याआधी त्यांचे रंगीत चित्र आहे. लक्ष्मीबाईबद्दल- त्यांचा जन्म, राज्ञी पद, राजकारण, युद्ध, क्रांती, दयाशीलता, वीरगती हे सगळे थोडक्यात येथे देण्यात आले आहे तर भगतसिंहांबद्दल लिहितांना त्यांची कार्यदक्षता, जालियनवालाबाग कांड, सायमन कमिशन वगैरेबाबत येथे सांगण्यात आले आहे. सावरकरांबद्दल देखील त्यांचा जन्म, बालपण, त्यांची प्रतिज्ञा, विदेशी वस्तुंचे दहन ह्याबद्दल येथे सांगण्यात आले आहे. त्यानंतर बोसांबद्दल देखील बालपण, उच्चशिक्षण, समाजसेवा, विदेशनगमन, राजकीय सेवा, स्वातंत्र्ययुद्धात पदार्पण ह्याबद्दल लिहिलेले आहे.

**३) राजकीय महापुरुष : भाग - १**

ह्या पुस्तकाला एकूण १५२ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर महात्मा गांधी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, बाल गंगाधर टिळक, लाला लजपतराय, प्रियदर्शिनी इंदिरा गांधी इ.चे रंगीत चित्रे दिलेली आहेत.

सगळ्या महापुरुषांबद्दल लिहितांना त्यांचा जन्म, लहानपण, शिक्षण, विवाह, त्यांचे कार्य, समाजसेवा, देशभक्ति, विदेशगमन इत्यादी सगळे सविस्तररित्या वर्णिले आहे.

**४) महर्षिवर्या :**

ह्या पुस्तकाला एकूण १४३ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर महर्षि वसिष्ठ, महर्षि विश्वामित्र, महर्षि वाल्मिकी, भगवान वेदव्यास, नारद, विदुर, महर्षि, अगस्त्य इत्यादींचे चित्र आलेले आहे.

ह्यात प्रत्येक महर्षिचा जन्म, कार्य आणि त्यांच्या रचना, त्यांचे चमत्कार, त्यांचे शिष्य इ.बद्दल आले आहे.

**५) त्यागधना :**

ह्या पुस्तकाला एकूण १२९ पाने आहेत. ह्याच्या मुखपृष्ठावर श्रीराम, श्रीकृष्ण,

दधीची, जीमुतवाहन, बलि चक्रवर्ती, शिबी-चक्रवर्ती, कर्ण ह्या सगळ्यांचे चित्र आहे. ह्या पुस्तकात ह्या सगळ्यांबद्दल थोडक्यात माहिती दिली आहे. ह्यामध्ये त्यांची त्यागभावना प्रामुख्याने सांगितली आहे. रामाबद्दल सांगतांना रामाचे वाल्मीकी तसेच नारदाचे सांगितलेले एकूण ८३ गुण येथे (सविस्तररित्या) सांगितले आहेत. त्यांनतर त्यांचा जन्म, विवाह, वनवास, सीता अपहरण आणि अवतार समाप्ती येथे वर्णिली आहे. त्यानंतर कृष्णाबद्दल त्याचा जन्म, बालपण, गोपुळातील गोपाल विश्वरूपदर्शनम्, गोवर्धनावरील संकटांचा नाश, कंसवध, मित्रभक्ती, जरासंधवध, नरकासुरवध, शिशुपालाचा वध, द्रौपदीचे लज्जा-रक्षण, महाभारतातील युद्ध ह्याबद्दल येथे थोडक्यात सांगितले आहे.

महर्षि दधीचि ऋषीबद्दल लिहितांना त्यांच्या शरीरत्यागाविषयी येथे सांगण्यात आले आहे. बलीराजाने आपल्या वचनासाठी वामनाला स्वतःचे राज्य दिले ही कथा येथे सांगितली आहे. त्याचप्रमाणे जीमूतवाहनाने स्वतःचे प्राण लावून सर्वांचे रक्षण केले ही कथा सुद्धा यात दिली आहे. शिबि चक्रवर्ती राजाने ''परोपकाराय इदं शरीरम्'' या वाक्याची पूर्ती कशी केली हे येथे सांगितले आहे. तसेच,

''सूतो वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहम्।।
दैवायत्तं कुले जन्म मदाय-तं तु पौरुषम्।।''

हे वचन म्हणणाऱ्या कर्णाबद्दल येथे सांगितले आहे. त्याचे मित्र प्रेम, परशुरामाचा शिष्य कर्ण, हस्तिनापुरात परत येणे, दानवीरता, एकनिष्ठता, दृढनिश्चयीपणा ह्या सगळ्यांबद्दल येथे सांगण्यात आले आहे.

**६) समाजोद्धारकाः**

ह्या पुस्तकाला एकूण १४१ पृष्ठे आहेत. पुस्तकाच्या मुखपृष्ठावर राजराममाहेन रॉय, आचार्य विनोबा भावे, साने गुरुजी, बापट महाराज, तुकडोजी महाराज, गाडगे महाराज ह्यांचे छायाचित्र दिलेले आहेत.

सर्वप्रथम राजा राममोहन रॉय ह्यांचे छायाचित्र देवून वंश, जन्म, आईचा प्रभाव, शिक्षण, गृहत्याग, वृत्ती-प्रवृत्ती, समाजसेवा, सती प्रथेचा निषेध, स्त्रियांच्या अधिकारांचे रक्षण, पुनर्विवाहाचे समर्थन, जातिभेदाचे निराकरण, परदेश गमन, विद्याक्षेत्र-साहित्यक्षेत्र, संस्कृतसेवा, चतुर्था सत्यप्रचार, आत्मीयसभा, ब्रह्मसभा, राममोहनांचे व्यक्तिमत्व आणि देहयात्रेची समाप्ती ह्याबद्दल विस्तृतपणे देण्यात आले आहे.



आचार्य विनोबा भावे ह्यांच्या रंगीत चित्राबरोबरच त्यांचे आजी-आजोबा, वडील, वंश, प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण, गांधीमहोदयांचा आश्रम, सत्याग्रह, कारावास, कारावासात देखील भाषेचे अध्ययन, भूदानयज्ञ, आपातकाल, मौनव्रत आणि देहत्याग ह्याबद्दल सविस्तर माहिती देण्यात आली आहे.

साने गुरुजींच्या संपूर्ण नावासोबतच त्यांचे मोठे रंगीत चित्र, त्यांचा कुलवृत्तांत, संघर्षपूर्ण छात्रजीवन, अध्येता आणि अध्यापक, जीवनाचा उत्तरार्ध, आंदोलन, उपेक्षित जनांबद्दल प्रेम, साहित्यसेवा, संस्कार, त्यांच्या आचार विचारातील सौंदर्य, आईची वीरत्वाची शिक्षा, सुसमृद्ध असे व्यक्तिमत्व आणि मृत्यू हे सगळे विस्तृतपणे दिले आहे.

महाभाग सेनापति बापट महोदयांचे रंगीत चित्रासोबतच बालपणीचा चपळपणा, विद्याभ्यास, मॅट्रिक परीक्षेतील यश, विवाह, महाविद्यालय, भिडेगुरुजींची प्रेरणा, शिष्यवृत्तीच्या सहाय्याने विदेशगमन, मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी शिष्यवृत्तीचा त्याग, अज्ञातवास, मित्रांकडून मिळालेला/झालेला विश्वासघात, सत्यशुद्ध जीवनशैली आणि पंचतत्वात विलीन होणे ह्याबद्दल दिलेले आहे.

संत तुकाराम महाराजांचा जन्म, बालपण, ईश्वर अन्वेषण, बाल-समाज स्थापना, कारागारवास, देशप्रेम, विश्वधर्मविचार, ग्रामगीता, राष्ट्रसंत आणि देहयात्रेची समाप्ती इत्यादी सगळे सुरुवातीला असलेल्या रंगीतचित्रासोबतच वर्णिले आहे.

संत गाडगे महाराजांचा जन्म, बालपण, विवाह, सामाजिक जीवनम्, गृहत्याग, कीर्तनाचा प्रारंभ, ऋणमोचन, पंढरपुरातील धर्मशाळेची निर्मिती, पुत्रविवाह, मातृनिधन, पुत्रनिधन, सामाजिक कार्य, त्यांचे अनुयायी, पत्रव्यवहार, व्यवहारनीति, अस्वास्थ्य आणि महानिर्वाण ह्याबद्दल विस्तृतपणे दिलेले आहे.

**७) आध्यात्मिक महापुरुषा :**

ह्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर ज्ञानेश्वर, विवेकानंद, नारायणगुरु, स्वामी रामतीर्थ, गुलाबराव महाराज ह्यांचे चित्र आहे. ह्या पुस्तकाला एकूण १४१ पृष्ठे आहेत.

पुस्तकाच्या सुरुवातीला प्रस्तावना तसेच उद्दिष्ट आलेले आहे. सगळ्या महापुरुषांबद्दल सांगण्याच्या आधी त्यांचे रंगीत चित्र दिलेले आहे. तसेच काही विशिष्ट प्रसंग देखील रेखाटले आहेत. प्रथम ज्ञानेश्वरांचे चित्र देवून त्यांच्याबद्दल सांगताना पूर्ववृत्तांत (म्हणजे वडिलांचे आईचे नाव, त्यांचे गाव) नंतर त्यांचे वडील कसे संन्यास्याचे गृहस्थ झाले, ज्ञानेश्वरांचा जन्म, वज्राघात, पितृनिधन,

मुक्ताबाईंचे ताटीचे अभंग, शुद्धिपत्र, शुद्धीपत्राची प्राप्ती, चाङ्देव पासष्टीत्रम्, ज्ञानेश्वरी प्रणनयम्, भावार्थदिपिका, ज्ञानेश्वरी-गीताव्याख्या, ज्ञानेश्वरांची गुरुभक्ति, विनम्रता, कर्तव्यनिष्ठता, ज्ञानोपासना, नामदेवांसोबत मिलन आणि अवताराची समाप्ती. ह्या सगळ्याबद्दल अगदी सविस्तर माहिती आली आहे.

त्यानंतर विवेकानंदाबद्दल त्यांचा जन्म, बालपण, कौमार्यावस्था, बालपणीच नायक असलेल्या नरेन् धीर नरेन्, गुरुच्या सान्निध्यातला नरेन्, त्यांच्या वडिलांचे पंचतत्त्वात विलीन होणे, नरेनचे विवेकानंदात रुपांतर/त्याचे नामकरण, रामकृष्ण परमहंसांची समाधि, स्वराष्ट्रप्रेम कन्याकुमारीला गमन, अमेरिकेचा प्रवास, विश्वधर्म समावेश, परत येणे ह्या सगळ्याबद्दल विस्तृत माहिती दिलेली आहे.

नारायण गुरुबद्दल लिहितांना त्यांचे आईवडील, त्यांचा जन्म, नाणुचे तरुण आचार्यामध्ये रुपांतर, त्यांची पत्नी, त्यांचे परिव्राजक रुप, योगी रुप, एका नव्या रीतीने शिवलिंगाची स्थापना, नारायण गुरुः त्यांचे कारुण्य, नारायण धर्म परिपालन ह्या संस्थेची स्थापना, त्यांचा बंधुभाव, सत्याग्रह आणि शेवटी अनंतात विलीन होणे ह्या सगळ्याबद्दल भरपूर माहिती येथे आलेली आहे.

स्वामी रामतीर्थ ह्यांचेबद्दल त्यांचा जन्म, विवाह, विद्याभ्यास, कालातील संघर्ष, त्यांची ईश्वरावरील श्रद्धा, उदार बुद्धि, तत्त्वचिंतन, आत्मसाक्षात्कार, संन्यासग्रहण, विदेश भ्रमण, मातृभूमीबद्दलची भक्ति आणि गंगेच्या प्रवाहात त्यांचे विलीन होणे ह्या सगळ्याबद्दल माहिती तसेच अनेक ठिकाणी प्रसंगानुरूप काही चित्रे आलेली आहेत.

त्यानंतर ह्या पुस्तकात अधुराद्वैताचार्य गुलाबराव महाराज ह्यांचे बद्दल दिल्या गेले आहे. त्यांचा जन्म, आईचा वियोग, शिक्षण, विवाह, विद्याव्यासंग, योगसाधना, दिनचर्या, पुस्तकप्रेम, कष्टिक गृहस्थाश्रम, कालायनीव्रत, भक्ति-रसगडा, परमार्थशिक्षण, अलौकिक शिक्षण पद्धतिः पत्नीविरह, गुरुरूपात शिवाची पार्थिव पूजा, योगदान, ब्रह्मस्थानी प्रयाण इत्यादीबद्दल ठिकठिकाणी चित्रांसकट विस्तृत माहिती दिलेली आहे.

### ८) सत्पुरुषाः

ह्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर सुदामा, भगीरथ, संत कबीर, तुकाराम, समर्थ रामदास, तुलसीदास, मीराबाई, गुरु गोविंदसिंह ह्यांचे रंगीत छायाचित्र आहे. पुस्तकाला एकूण १३९ पृष्ठे आहेत. सुरुवातीला अनुक्रमणिका दिलेली आहे तसेच प्रत्येक सत्पुरुषाबद्दल सांगण्याच्या आधी त्याचे रंगीत चित्र दिलेले आहे.

सर्व प्रथम सुदामाबद्दल सांगितले आहे तसेच त्याचे रंगीत चित्रही दिलेले आहे. त्यांच्याबद्दलची माहिती देताना मुख्य प्रसंगी काही छोटे छोटे चित्रही दिलेले आहेत. सुदामा आणि श्रीकृष्ण ह्यांचे बालपण, शिक्षाध्ययन अगदी थोडक्यात दिलेले असून मोठेपणी कृष्णाकडे रिकाम्या हातानी कसे जायचे हा प्रश्न पडलेल्या सुदामाबद्दही येथे सांगण्यात आले आहे. नंतर त्याचे निघणे, द्वारकेमध्ये प्रवेश, श्रीकृष्ण-सुदामा मिलन, पृथफकार्पण, चिन्तनम्, ह्या सगळ्याबद्दल सविस्तर माहिती आलेली आहे.

राजा भगीरथाबद्दल लिहितांना सर्वप्रथम त्यांचे दोन रंगीत छायाचित्रे आहे. नंतर सूर्यवंशाची कथा यात दिलेली आहे. सगर राजाचे ६००१ पुत्र नंतर दिलीप राजा त्याचा पुत्र भगीरथ ह्याचेबद्दल सविस्तर माहिती दिलेली आहे. भगीरथाची तपस्या, त्याला मिळालेले वर इत्यादीबद्दल सांगितले आहे. भगीरथाकडून गंगेचे पृथ्वीवर अवतरण हे देखिल येथे विस्तृतरित्या आलेले आहे.

संत कबीरांच्या २ जन्मकथा, त्यांचे बालपण, सद्गुरुलाभ, विवाह, त्यांचे व्यक्तिमत्त्व, भगवत्कृपा, त्यांचे साहत्य, सिद्धांत आणि महाप्रयाण ह्यांच्याबद्दल थोडक्यात माहिती दिलेली आहे.

तुकाराम महाराजांबद्दल लिहितांना त्यांचा जन्म, बालपण, विवाह, त्यांच्यावरील कालाचा झालेला विपरीतपणा, त्यांचे कार्यान्वेषण, क्षेत्ररक्षण, विठ्ठलाची कृपा, त्यांचा विरक्तपणा, सद्गुरुप्राप्ती, शिवराज्यांचे आगमन आणि त्यांचा देहत्याग हे सगळे विस्तृतपणे आलेले आहे.

समर्थ रामदासांचे रंगीत चित्र सुरुवातीला नंतर बालपण, हनुमंत अवतार, नारायण 'रामदास' झाले, रामदास समर्थ झाले, त्यांचे जनजागरण आणि त्यांचे अनंतात विलीन होणे ह्या सगळ्यांबरोबरच ठिकठिकाणी त्यांचे मनाचे श्लोकही आलेले आहेत.

तुलसीदासांबद्दल लिहिताना त्यांचा काळ, त्यांना झालेला पितृवियोग, सद्गुरु रामभक्त, विवाह, तुलसीदासांचे आत्मज्ञानी होणे, भक्तिमार्ग, श्रीरामदर्शन, रामचरितमानस, ह्याबद्दल येथे लिहिण्यात आले आहे.

कृष्णरसिका मीराबाईबद्दल येथे ह्या पुस्तकात विस्तृतपणे दिलेले आहे. त्यांचे शैशव, कृष्णप्रिया मीरा, विवाह, भक्तीचे प्रकार, मीरेचा भक्तिप्रपंच, मीरेचे अकबराला प्रभावित करणे, अनर्थ परंपरा आणि अमर झालेली मीरा येथे उत्तमरित्या रेखाटली गेली आहे.

सीख धर्मगुरु गुरुगोविंदसिंह ह्यांचे रंगीत चित्र सुरुवातीला देवून त्यांचा जन्म, बालपण, युद्धयात्रा, त्यांचे संघटन कौशल्य आणि अंतिम जीवन ह्यांच्याबद्दल विस्त तिपणे लिहिले आहे. सोबत युद्धभूमीचे चित्रही दिलेले आहे.

**९) राजवर्या :**

ह्या पुस्तकाला एकूण १४९ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर दुष्यन्त, धर्मराज-युधिष्ठिर, श्रीकृष्ण देवराय, महाराणा-प्रताप, शिवाजी-महाराज, छत्रसाल ह्यांचे रंगीत चित्र आहे.

दुष्यन्त राजाचा महाभारतात असलेला त्याच्या अस्तित्वाचा पुरावा, भरतपिता दुष्यन्त, शकुतंला, शकुतंलेची माता मेनका, मारिच मुनींच्या आश्रमात खेळत असलेला दुष्यन्ताचा पुत्र इ. सगळे विस्तृतरित्या दिले आहे.

धर्मराज युद्धिष्ठिर यांचा जन्म, गुरु द्रोणाचार्य, पांडव आणि कुंती ह्यांचे रहस्यमय मार्गाने वनात जाणे, द्रौपदी वस्त्रहरण, यक्ष प्रश्न इ. सगळे आले आहे.

राजा श्रीकृष्णदेवराय ह्यांच्याबद्दल लिहितांना दक्षिण भरताची राज्यस्थिती, हरिहर, श्रीकृष्णदेवराय, राज्याभिषेक, साम्राज्यवृद्धि, विजययात्रा, विवाह, महान योद्धा, साहित्य आणि उपसंहार हे सगळे दिले आहे.

राजा महाराणाप्रताप ह्यांच्याबद्दल लिहितांना अश्वाची स्वामिनिष्ठा, हल्दीघाटी युद्ध, वीरजननी राजस्थानभूमी, स्वतंत्रताप्रिय मेवाडराज्य, अकबराची वक्रदृष्टी, प्रतापांची रणनीति, कला- प्रियराजा इत्यादींचे विस्तृत वर्णन आले आहे.

छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म, शिक्षण, स्वराज्य स्थापनेची प्रतिज्ञा, जिंकलेला रायगड, अफजलखानाचा वध, रुधिरपानवी पावनखिंड, शाहिस्तेखानाच्या बोटांचे तोडणे, मुराबाजींची वरीगती, शिवरायांची राज्यव्यवस्था आणि त्यांचे अनंतात विलीन होणे इ. सगळे आले आहे.

वीर छत्रसाल ह्यांचे शौर्य, पित्याची मनोव्यथा, आई-वडिलांचा मृत्यू, महाराज जयसिंहाच्या सेवेतील छत्रसाल, रायगडाची प्राप्ती, शिवाजीसोबत मेलन, स्वातंत्र्ययुद्धाचा प्रारंभ, राज्याभिषेक, औरंगजेबाची पूर्तता हे सगळे दिले आहे.



**१०) बालरत्नानि**

ह्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर नचिकेत, अष्टावक्र, प्रल्हाद, ध्रुव आणि अभिमन्युकुमार ह्यांचे चित्र आहे. ह्या पुस्तकाला एकूण ११७ पृष्ठे आहेत. ह्या पुस्तकातदेखील प्रत्येक बालरत्नाबद्दल लिहिण्याआधी त्यांचे रंगीत चित्र रेखाटले आहे. नचिकेताबद्दल लिहितांना त्याचे माता-पिता, त्याचे बालपण, यमराजाकडून त्याने मिळविलेले ज्ञान, यमराजाने दिलेला वर, यमराजाकडून मिळवलेला उपदेश ह्याबद्दल सांगितले आहे. तसेच **ओम सह नाववतु। सह नौ भुनक्तु। सह वीर्यं करवावहै। तेजस्वी नावधीतमस्तु। मा विद्विषावहै।। ओम शान्तिः शांन्तिः शांन्ति।।** ही प्रार्थना यजुर्वेदातील कठोपनिषदातील आहे हे देखील ह्या पुस्तकात सांगितलेले आहे. त्यानंतर अष्टावक्र हा पितृभक्त बालक होता. त्याचा कुलवृत्तांत, त्याचा जन्मवृत्तांत, त्याचे विद्यार्जन, त्याची अद्‌भूत मेधशक्ति, अपूर्व निश्चय त्याचा आत्मविश्वास आणि पितृभक्ति वगैरेचे ह्यात वर्णन दिले आहे. ध्रुवबाळाबद्दल देखील ह्या पुस्तकात सविस्तर सांगितले आहे त्याचा निरागसपणा वडिलांच्या मांडीवर बसण्याचा हट्ट, त्याला मिळालेले दुःख, त्याची तपश्चर्या, त्याला मिळालेला वर ह्याबद्दल येथे सांगितले आहे. त्यानंतर भक्त प्रल्हादाबद्दल कथा आली आहे. त्याचा विष्णूभक्त म्हणून केला गेलेला तिरस्कार, त्याची भक्ती हे सगळेच सांगितले आहे. अभिमन्युबद्दल सांगतांना त्याचा आईच्या गर्भात प्रवेश, त्याचा जन्म, त्यांचा विवाह, त्याला मिळालेले ज्ञान, बिकट परिस्थिती, युद्धाचा आरंभ, अभिमन्युचा पराक्रम ह्या संगळ्यांबद्दल व्यवस्थित माहिती दिलेली आहे.

**११) शिक्षणमहर्षय :**

ह्या पुस्तकाला एकूण १५० पृष्ठे आहेत. ह्याच्या मुखपृष्ठावर ईश्वरचंद्रविद्यासागर, महात्मा ज्योतिबा फुले, धोंडो केशव कर्वे, पंडित मदनमोहन मालवीय, डॉ. सर्वपल्लि राधाकृष्णन ह्या सगळ्यांची रंगीत चित्रे आहेत. तसेच प्रत्येक शिक्षण महर्षीबद्दल लिहिण्याच्या आधी त्यांची रंगीत पूर्ण पानभर चित्रे आहेत.

ईश्वरचंद्र विद्यासागरांचा जन्म, बाल्यकाळ, विद्याभ्यास अध्ययन, संस्कृतशिक्षण, विद्यार्थीजीवन, त्यांचे कार्यक्षेत्र, मातृ-पितृभक्ति, दयाभाव, दानशीलता, त्यांची समाजसंस्कारकार्य-स्त्री-शिक्षा, विधवा विवाह, विद्या प्रचार, पारिवारीक जीवन, देहत्याग इ. वर्णिले आहे.

महात्मा ज्योतिबा फुलेंचा जन्म, शिक्षण, देशभक्तिचे बीजारोपण, ध्येयचिन्तन, स्त्रीशिक्षण, त्यांची पत्नी, गृहत्याग, उपेक्षितांसाठी शाळा, सत्कार, विधवा-विवाह, अंतिम संदेश इ. सविस्तरपणे सांगितले आहे.

महर्षी धोंडो केशव कर्वे ह्यांचा कुटुंब परिचय, विवाह, सेवानिवृत्ति, मुक्तजीवन, वीर वृत्ति, धैर्याचे मोल आणि देहत्याग इ. विस्तृतपणे दिले आहे.

पंण्डित मदनमोहन मालवीय ह्यांचा जन्म, विद्याध्ययन, इंग्रजी भाषेचं शिक्षण, उच्च शिक्षअध्ययन, विवाह, एक उत्तम वक्ता, संपादक, अधिवक्ता, हिंदू विश्वविद्यालयाचे स्वप्न, शिलान्यास, मनोधारणा, आदर्श पत्रकार, भाषाप्रभुत्व, क्रांतीकारी व्यक्तिमत्त्व आणि महानिर्वाण इ.बद्दल आले आहे.

श्री सर्वपल्लि राधाकृष्णन ह्यांचा जन्म, विद्याभ्यासारंभ, परीक्षेतील यश, तत्त्वज्ञानाविषयी रूचि, विवाह, जिवनाकडे पाहण्याची दृष्टी, उत्तम अध्यापक, आर्थिक अडचण, दर्शनशास्त्रात पारंगतता, महात्मा गांधी सोबतचा वार्तालाप, 'भारतीय दर्शन' नावाचा ग्रंथ, विदेशयात्रा, अमेरिका प्रस्थान, आक्सफोर्डमधील उपाधि, 'सर' राधाकृष्णन, काशी हिंदू विश्वविद्यालयाचे कुलपति, 'भारतछोडो' आंदोलन, स्वातंत्र्याची घोषणा, भारताचे द्वितीय राष्ट्रपती, भारतरत्न आणि पंचतत्त्वात विलीन होणे इत्यादी सगळे सविस्तरपणे दिले आहे.

**१२) योगिवर्याः**

ह्या पुस्तकाला एकूण १६५ पृष्ठे आहेत. ह्याच्या मुखपृष्ठावर श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य ह्यांचे सन्यासी रूप, हे मध्वाचार्य, भारताचे पुण्यफल, गुरु शिष्यांचे मल्लयुद्ध पूर्णप्रज्ञ आनन्दतीर्थ मध्य, धर्मसंस्था स्थापन्यासाठी देश भ्रमण, श्रीकृष्ण प्रतिष्ठा, सर्वशास्त्रपारंगतता, अतीम बदरीगमन ह्याबद्दल आले आहे.

भगवान रमण महर्षि ह्यांचा जन्म-बालपण, बाल-रमण मृत्यूचा अनुभव, गृहत्याग, घोर तपस्या, रमण महर्षि, मौनोपदेश, स्थितप्रज्ञता, जीव-कारुण्य, महासभाधी इत्यादी बद्दल आहे आहे.

श्रीरामकृष्णपरमहंस ह्यांचा जन्म, बालपण, साधुंबद्दल आदर, नामकीर्तनात तन्मयता, भक्तितन्मयता, मंदिरातील कालीसेवा, भक्तिपरवशता, विवाह, विवेकानंद, परमपदप्राप्ती इत्यादी आले आहे.

पूर्णयोगी महर्षि अरविंद ह्यांचा जन्म, इंग्लंड-विद्याभ्यास, प्रतिभा, बरोडा-सेवा, महर्षि अरविंदांचे-संस्कृत, विवाह, देशभक्ति, साहित्यसेवा, अरविंदांचे



योगसाहित्य, सावित्री-महाकाव्य, पूर्णयोग, महायोगी ह्याबद्दल दिले आहे.

योगी जनार्दनस्वामी ह्यांचे पितृछत्र हरवणे, तीर्थयास्त्रा योगशिक्षा, ग्वाल्हेर तपस्या, नर्मदा तीरावरून योगप्रवासाचा शुभारंभ, नागपुरात येणे, चर्मकाराचे निमंत्रण, बलवंत स्वामी, स्वामींचा संदेश आणि अंतिम दिन ह्यांबद्दल आले आहे.

**१३) विशिष्ट महिला :**

ह्या पुस्तकाला एकूण १३३ पृष्ठे आहेत. पुस्तकाच्या मुखपृष्ठावर मैत्रेयी, सतीसावित्री, द्रौपदी, जिजाबाई, लक्ष्मीबाई केळकर, मॅडम कामा, मदर-तेरेसा, कल्पना चावला ह्या सगळ्यांची रंगीत चित्रे आहेत. प्रत्येक महिलेबद्दल लिहितांना त्यांचे सुरुवातीला रंगीत चित्र दिले आहे.

सर्वप्रथम मैत्रेयीबद्दल सांगतांना उपनिषद काळातील स्त्रीजीवन, मैत्रेयी सीतेची शिक्षिका, ब्रह्मज्ञान प्राप्ती, ब्रह्मवादिनी गार्गी, याज्ञवल्क्य गार्गी संवाद हे सांगितले आहे.

सती सावित्रीबद्दल सांगताना भगवतीचा कृपाप्रसाद वरान्वेषण, सत्यवान वृत्तांत, राजभवन, सावित्रीचा दृढ निश्चय यम-सावित्री-संवाद हे सगळे लिहिले आहे.

महासती द्रौपदी हिच्याबद्दल लिहितांना पांडवांची पत्नी, जयद्रथाचे नीचकृत्य, कीचकवध, युद्धासाठी द्रौदपदीचा आग्रह, स्वर्गारोहण इत्यादि सगळे आले आहे.

कर्तृत्वशालिनी जिजामाता ह्यांचा जन्म, मोलाजी भोसले, रंगोत्सवाचा तो दिवस, जिजामातेच्या मातृगृहाचा नाश, स्वराज्याचा सूर्योदय, शिवरायांच शिक्षण, वात्सल्यरूपी जिजामाता, लोकदर्शिनी, राजमाता, लोकमाता जिजामाता हे सगळे सांगितले आहे.

मावशी लक्ष्मीबाई केळकर ह्यांचा जन्म, सासरी जाणे, समितीचा शुभारंभ ह्याबद्दल लिहिले आहे.

मॅडम कामा ह्यांचा जन्म वृत्तांत, विवाह, प्लेगपिडितांची सेवा, विदेशयात्रा, राष्ट्रध्वजनिर्मिती, स्वातंत्र्याची अग्रदूत, फ्रान्स गमन, प्रतिबंध आणि देहांत ह्यांबद्दल आले आहे.

करुणामूर्ति मदर-तेरेसा ह्यांचे सुसंस्कारयुक्त शैशव ध्येयपूर्ण तारुण्य, ॲग्नेसची टेरेसा, सुभाषिणी-सिस्टर ॲग्नेस, नोबल पुरस्कार, प्रेम हाच ईश्वर आणि पंचतत्त्वात विलीन होणे हे आले आहे.

कल्पना चावला ह्यांच्याबद्दल त्यांचा जन्म, शिक्षण, विलक्षण प्रतिभा, विवाह,

महादुर्दैव ह्या सगळ्यांबद्दल सांगितले आहे.

**१४) महाकवय :**

ह्या पुस्तकाला एकूण १४८ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर कालिदास, बाणभट्ट, बंकिमचंद्र चॅटर्जी, रविन्द्रनाथ टागोर, सुब्रह्मण्य भारती ह्यांचे रंगीत चित्र दिलेले आहे. तसेच प्रत्येकाबद्दल लिहितांना त्यांचे सुरुवातीला एक रंगीत चित्र दिले आहे. महाकवि कालिदासांबद्दल अगदी त्यांच्या संगोपनापासून, त्यांचा विवाह आणि नंतर कालीमातेच्या आशीर्वादाने झालेले महाकवी कालीदास इ. सविस्तर वर्णिले आहे. तसेच कालिदासाचे साहित्य म्हणजेच कुमारसंभवम्, रघुवंशम्, मालविका-अग्निमित्रम्, विक्रमोवयशीयम्, अभिज्ञानशाकुन्तलम्, मेघदूतम्, ऋतुसंहार ह्याबद्दल दिले आहे.

महाकवि बाणभट्टांचे वंश, आई-वडील, ज्ञानार्जन, स्वतःच्या गावातील आनंद, राजाचे आमंत्रण, कृष्णआर्यांचा संदेश, राजस्थानात जाणे, महाराजांचे दर्शन इ. सांगितले आहे व त्यांचे साहित्य हर्षचरितम्, कादंबरी ह्यांचे थोडक्यात वर्णन आलेले आहे.

महान कवी बंमिचंद्र ह्यांचा काळ, शिक्षण, शेतकरी, साहित्य, विषवृक्ष, आनंदमठ इत्यादींचे वर्णन आलेले आहे.

महाकवि रविंद्रनाथ टागोर ह्यांचा मुल वृत्तांत, बाल्यकाल, बालपणातील कवी, लंडनला जाणे, 'कवी' रुपातील प्रसिद्धि, विवाह, जीवनातील परिवर्तन, शांतिनिकेतन, ब्रह्मचर्यआश्रमाचा उत्कर्ष, दिनचर्या, राजनीतीतील टागोर, राष्ट्रगीताचे निर्माण कार्य, इंग्लंडवास, गीताकाली प्रकाशन, नोबेल पुरस्कार, देशप्रेम, युरोपयात्रा, फ्रान्स प्रवास आणि अंत ह्यांच्याबद्दल आले आहे.

देशभक्त महाकवी श्रीसुब्रह्मण्य भारती ह्यांचा जन्म, शिक्षण, विवाह, राजकीय जीवन, स्वदेशमित्राला-पत्रिका, पॉण्डिचेरीतील वास, मद्रास वास, व्यक्तिमत्त्व आणि देहयात्रेची समाप्ती याबद्दल आले आहे.

**१५) प्रसिद्धाः वैज्ञानिकाः**

ह्या पुस्तकाला एकूण १५१ पृष्ठे आहेत. ह्याच्या मुखपृष्ठावर विश्वेश्वर, श्रीनिवास-रामानुजन्, चंद्रशेखर वेंकट रमन, डॉ. होमी भा, डॉ. जयंत नारळीकर ह्यांचे रंगीत चित्रे दिलेली आहेत.



विश्वेश्वरांचा जन्म, शिक्षण, विवाह, मैसुरसेवा, औदार्य, स्वदेश उम्कर्ष चिंतन, भारताचे पुर्ननिर्माण, जीवन रीती, विजय इत्यादीबद्दल आले आहे.

श्रीनिवास रामानुजन् ह्यांचा जन्म, शिक्षण, कुटुंब, विवाह, प्रोत्साहन, लघुउद्योग, गणितअध्यापक, विलक्षण गणित ज्ञान इत्यादीबद्दल दिले आहे.

महान भौतिकशास्त्रज्ञ सर सी.व्ही. रमन ह्यांचा जन्म, शिक्षण, विवाह, दयाळुपणा, विदेशगमनम्, अंतिम समय ह्याबद्दल दिले आहे.

डॉ. होमी भाभांचा जन्म, शिक्षण, विद्यापीठ, विवाह, मानवहितकारक अनुसंधान इ. बद्दल आले आहे.

डॉ. जयंत नारळीकरांचा जन्म, शिक्षण, कार्य इत्यादीबद्दल सांगितले आहे.

**१६) वणिग्वरा :**

ह्या पुस्तकाला एकूण १३५ पृष्ठे आहेत. ह्याच्या मुखपृष्ठावर जमशेटजी टाटा, जुगलकिशोर बिरला, धीरुभाई अंबानी, लक्ष्मणराव किर्लोस्कर, शंतनुराव किर्लोस्कर, बालचंद्र हिराचंद्र इत्यादींचे रंगीत चित्र दिलेली आहेत.

ह्या पुस्तकातही प्रत्येक उद्योगपतींचा जन्म, विवाह, कार्यनिष्ठता, केलेले कार्य, कर्मनिष्ठता, कार्याची व्याप्ती इत्यादी बद्दल आले आहे.

**१७) कलाविदः**

ह्या पुस्तकाला एकूण ९४ पाने आहेत. ह्याच्या मुखपृष्ठावर सत्यजित राय, दादासाहेब फाळके, बालगंधर्व, नन्दलाल बोस, लता मंगेशकर, अमिताभ बच्चन ह्यांचे रंगीत चित्र आहेत. तसेच प्रत्येकाबद्दल सांगतांना त्या आधी एक मोठे रंगीत चित्र आहे.

सत्यजि राय ह्यांचा जन्म, बालपण, भारताची प्रथम चित्रपट समिती, चित्रीकरण, त्यांची लेखन कला, संगीतातील रुचि, दिनक्रम त्यांना मिळालेले पुरस्कार जसे की 'जी जॉ दि ऑनर' दादासाहेब फाळके पुरस्कार, पद्मश्री-पद्मभूषण-पद्मविभूषण, मॅगसेसे इत्यादी आणि त्यांचा मृत्यू ह्याबद्दल आले आहे.

दादासाहेब फाळकेंची दृढ प्रतिज्ञा, चित्रपटकथा, सिद्धता, पात्र-योजना, प्रथम चित्रपट हे सगळे आले आहे.

अभिनय सम्राट श्री बालगंधर्व ह्यांचे नाटकांचे प्रयोग, प्रथम नाटक, त्यांचे कार्य इत्यादींबद्दल आले आहे.

महान चित्रकार श्रीनंदलाल बोसांचा जन्म, आई-वडिलांचा प्रभाव, कलेतील रूचि, विवाह, गुरुंशी भेट, बहिण निवेदितावरील प्रेम, भारत दर्शन, सर्वांगीण विकास आणि मृत्यू इ. आले आहे.

गानसम्राज्ञी लता मंगेशकरांचा जन्म, लहानपणापासून असलेली गाण्यातील आवड, अभिनय, पितृवियोग, गान साधना, संगीताला वाहून घेतलेले जीवन, देशभक्ती इ. आले आहे.

अभिनय सम्राट अमिताभ बच्चनांचा जन्म, वडिलांना झालेला पुत्रजन्माचा आनंद, शिक्षण कष्टिक काळ, सिनेमात प्रवेश, हरिवंशराय बच्चन, कौन बनेगा करोडपति इत्यादी आले आहे.

**१८) शास्त्रवर्याः**

ह्या पुस्तकाला एकूण १६६ पृष्ठे आहे. मुखपृष्ठावर आर्यभट्ट, महर्षि कणाद, भटनागर, मेघनाद साहा, डॉ. प्रफुल्लचंद्र रॉय, जगदीशचंद्र बोस, डॉ. अब्दुल कलाम ह्यांचे रंगीत चित्र दिलेले आहे.

सगळ्या शास्त्रज्ञांचा वृत्तांत, कार्य, रुचि, शोध, संपादन इत्यादीबद्दल येथे देण्यात आले आहे.

**१९) राजकीय महापुरुष :**

ह्या पुस्तकाला एकूण १०९ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर पंडित जवाहरलाल नेहरू, डॉ. राजेंद्र प्रसाद, लालबहादूर शास्त्री, डॉ. हेडगेवार ह्यांचे रंगीत चित्रे दिलेली आहेत.

प्रत्येक महापुरुषांबद्दल लिहितांना त्यांचा जन्म, बालपण, शिक्षण, विवाह, राजनैतिक कार्य, देभभक्ति, देशसेवा इत्यादीबद्दल दिले आहे.

**२०) आधुनिक राजकीय नेतार : भाग-१**

ह्या पुस्तकाच्या पृष्ठभागावर चार राजकीय नेत्यांची चित्रे आहेत. ह्या पुस्तकात यशवंतराव चव्हाण, डॉ. पंजाबराव देशमुख, राजीव गांधी, श्रीमान जिचकार ह्यांच्याबद्दल दिलेले आहे. ह्या पुस्तकात देखील प्रत्येक राजकीय नेत्याबद्दल लिहिण्याआधी त्याचा पूर्व पानावर रंगीत चित्र आहे. पुस्तकाला एकूण ८४ पृष्ठे आहेत. ह्या पुस्तकात नेत्यांबद्दल सांगतांना त्यांना जन्म, देशभक्ती, राष्ट्रप्रेम भूषविलेले मंत्रिपद, घेतलेल्या उपाधि, केलेले कार्य ह्याबद्दल सविस्तर माहिती दिलेली आहे. डॉ. जिचकारांचे तर संपूर्ण कुटुंबासोबतचे छायाचित्र येथे देण्यात आले आहे.

**२१) चिरंजीविनः**

ह्या पुस्तकाच्या पृष्ठभागावर विष्णु, येशू ख्रिस्त, महम्मद पैंगम्बर, परशुराम ह्यांचे चित्र आहे. ह्या चारही भगवंतांचे अवतार, साधना, महत्त्वाचे प्रसंग, त्यांचे धर्मावरील प्रेम, दीनांवरील प्रेम, त्यांचे कार्य ह्या सगळ्यांबद्दल थोडक्यात माहिती दिलेली आहे. प्रत्येक अवताराबद्दल लिहिण्याआधी त्यांचे रंगीत चित्र दिलेले आहे. जसे की विष्णुचा मत्स्यावतार, कूर्मावतार, येशुचा जन्म, त्यांचे निर्गमन वगैरे ह्या पुस्तकाला एकूण ९४ पृष्ठे आहेत.

**२२) क्रीडानिपुणाः**

याच्या मुखपृष्ठावर सचिन तेंडुलकर, सुनिल गावस्कर, पी.टी.उषा यासारख्या ८ क्रिडानिपुणांचे रंगीत छायाचित्रे दिलेली आहेत. ह्यांचे चित्रकार श्री. भाऊ दांदडे आहेत. पुढील पानावर प्रस्तावना व उद्दिष्ट आलेले आहे. ह्या पुस्तकाला एकूण १०१ पाने आहेत. प्रत्येक क्रिडानिपुणांच्या माहितीच्या आधी त्याचे रंगीत चित्र पूर्ण पानभरच आहे. ह्या पुस्तकात सी.के.नायडू, श्री.कोडि राममूर्ति, गामा मल्ल मेजन ध्यानचंद, सुनील गावस्कर, सचिन तेंडुलकर, पी.टी.उषा, विश्वनाथ आनंद, करणं मल्लेश्वरी या क्रिडापटूंबद्दल म्हणजेच त्यांचे जन्मस्थान दिवस, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांचे क्रिडाप्रेम, त्यांच्या खेळविश्वातील काही निवडक घटना आणि त्यांना प्राप्त झालेला पुरस्कार ह्याबद्दल सविस्तर माहिती दिली गेली आहे.

**२३) आधुनिक राजकीय नेतार : भाग-२**

ह्या पुस्तकाला एकूण २३ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर श्री.पी.वी. नरसिंहराव, अटलबिहारी वाजपेयी, शरदचंद्र पवार ह्यांचे रंगीत चित्र आहेत.

सगळ्या राजकीय नेत्यांचे जन्म, शिक्षण, कार्य, इत्यादीबद्दल यात सांगितले आहे.

एकूणच हा २३ पुस्तकांचा संच अतिशय बालोपयोगी आहे हा संच लहान मुलांच्याच नव्हे तर मोठ्यांच्याही ज्ञानात भर घालणारा आहे. ह्या संचामुळे संस्कृत बाल साहित्यात मोलाची भर पडलेली आहे.

संस्कृत साहित्यातील बालसाहित्याचे अल्पप्रमाण लक्षात घेवून विद्यापीठाने उचललेले हे पाऊल अतिशय महत्त्वाचे आहे. देशाच्या भावी नागरिकांना

देववाणीच्या माध्यमातून थोर विभूतींचा परिचय करून देण्याचा विश्वविद्यालयाचा हा उपक्रम निश्चितच श्लाघनीय आहे.

या सर्व पुस्तकांचे अध्ययन केल्यानंतर त्यांची काही वैशिष्ट्ये ठळकपणे जाणवली.

१) सर्वच पुस्तकांची भाषा अतिशय सोपी आहे. त्यात सामासिक पदे नाहीत. शब्दांची रूप देखील साधीच आहे.

२) बालकांसाठी तयार केल्यामुळे अक्षर ठसठशीत आहेत.

३) प्रत्येक पुस्तक बालकांचा विचार करून त्यांची आवड लक्षात घेवून सचित्र निर्माण केले गेले आहे. पुस्तकांच्या आतील व्यक्तीरेखांचे रेखाटन पुस्तकांच्या मुखपृष्ठावर अगदी आवर्जून दिलेले आहे.

४) प्रत्येक पुस्तकाच्या मलपृष्ठावर कवी कुलगुरु कालीदास संस्कृत विश्वविद्यापीठाची मुद्रा आहे.

५) सोपी भाषा, अक्षरे ठसठशीत यांमुळे वाचनात सुलभता निर्माण होते. त्याचप्रमाणे सचित्र असल्या कारणाने वाचनांतील रूची देखील वाढते.

६) या सर्व पुस्तकांमध्ये प्राचीन ते आतापर्यंतच्या काळातील विविध क्षेत्रांची माहिती तसेच ऋषी, तत्त्वज्ञ, संशोधक, विचारवंत, क्रिडापटू, शिक्षणतज्ञ, राजकीय नेता, स्वातंत्र्य सैनिक, देवी अवतार अशा अनेक प्रकारच्या विषयांची माहिती अगदी सहज आणि सरळ भाषेत दिलेली आहे.

**२४) बालकथातरंङ्गिणी**

हे पुस्तक डॉ. सौ. शारदा रमेश गाडगे ह्यांनी लिहिलेले आहे. ह्या पुस्तकाला एकूण ५३ पृष्ठे आहेत. ह्याचे प्रकाशक संस्कृत भाषा प्रचारिणी सभा, नागपूर आहेत. या पुस्तकाचे प्रकाशन २०११ मध्ये झाले आहे. ह्याचे मुखपृष्ठ सौ. शर्वरी गाडगे ह्यांनी केले आहे. ह्यात एकूण २० कथा आहेत. सगळ्या कथा बालकांना अनुसरूनच लिहिल्या गेल्या आहेत. लहान मुलांचे लक्ष वेधण्यासाठी प्राणी आणि पक्षी ह्यांचा ह्या कथांमध्ये उपयोग केला गेला आहे.

लेखिकेची भाषा अत्यंत सोपी आहे. कुठेही क्लिष्टता सामासिक पदे, अलंकार ह्यांचा उपयोग केलेला नाही. त्यामुळे हे पुस्तक लहान मुलांना अतिशय वाचनीय आहे. ह्या सर्व कथा बोधप्रद आहेत.



**२५) बालकथापुष्पहार :**

ह्या पुस्तकाच्या लेखिका डॉ.शारदा रमेश गाडगे आहेत. हे बालकथांचे पुस्तक २०१७ साली संस्कृत भाषा प्रचारिणी सभेतर्फे प्रकाशित झाले आहे. प्रस्तुत पुस्तक लेखिकेने गुरुवर्य प्रज्ञाभारती डॉ. श्री. भा.वर्णेकर ह्यांना सादर समर्पित केले आहे. ह्यात एकूण २० कथांचा समावेश आहे. यातील प्रत्येक कथेत लेखिकेने लहान मुलांना उद्देशून काही उपदेश केले आहेत. जसे- आईचा सन्मान करावा, दुसऱ्यांशी कधीही तुलना करू नये, वास्तवात जगावे स्वप्नात नाही, घरातील वडीलधाऱ्यांवर प्रेम करावे त्यांचा आदर करावा, भांडणाने काहीही साध्य होत नाही. अगदी साध्या आणि प्रेमळ भाषेत कथा रंगवून हे सगळे उपदेश लेखिकेने केले आहे. ज्यामुळे आपण उपदेशपर वचन वाचत आहोत असे वाचकाला वाटत नाही; मात्र उपदेश करण्याचा लेखिकेचा हेतूही साध्य होतो.

**२६) रम्या रामायणी कथा :**

डॉ. कल्याणी काळे विरचित 'रम्या रामायणी कथा' हा बालकथासंग्रह आहे. प्रकाशक संस्कृतभारती, नवदहेली ह्यांच्यामार्फत २०१३ साली हा कथासंग्रह पुस्तक रूपात प्रकाशित झाला.

सर्वश्रुत रामायणातील २२ विषयांवरील कथा लहान मुलांना समजतील अशा सोप्या भाषेत लेखिकेने रचल्य आहेत. लघुकथा असल्या कारणाने लहान मुलांना त्या वाचनीय आहेत. मुळ रामायण बालकांपर्यंत पोहचविण्याचा लेखिकेचा हा प्रयत्न स्तुत्य आहे.

**२७) संस्कृतबालनाट्य संवाद मञ्जूषा :**

ह्या पुस्तकाची रचना डॉ. विजया रामचंद्र जोशी यांनी केली आहे. हे पुस्तक संस्कृत भाषा प्रचारिणी सभेने २०१३ मध्ये उज्जैन येथील संस्कृत पुस्तक मेळ्यामध्ये प्रकाशित केले. या पुस्तकात लेखिकेने लहान मुलांच्या दृष्टीने लघु-लघु संस्कृत संवाद लिहिले आहे. त्यातील काही संवादांची बीजे लेखिकेने डॉ. शारदा गाडगे यांच्या बालकथांमधून घेतली आहेत. हे सर्वच संवाद प्रयोगक्षम आहेत. शाळांमधील संस्कृत शिक्षकांनी त्यांचा संस्कृत प्रचारासाठी यथायोग्य उपयोग करून घ्यावा अशी मनीषा लेखिकेने प्रस्तावनेमध्ये व्यक्त केली आहे.

**२८) बालनाट्यवल्लरी :**



या बालनाट्य संग्रहाच्या लेखिका श्रीमती दुर्गाताई पारखी आहेत. हे पुस्तक

संस्कृत भारतीने प्रकाशित केले. या नाट्यसंग्रहात एकूण ३० बालनाटके आहेत. शालेय विद्यार्थ्यांना उद्देशून या नाटकांची रचना लेखिकेने केली आहे.

**२९) परिव्राजकत्रयम् :**

प्रस्तुत पुस्तक डॉ. विजया विलास जोशी यांनी रचले आहे. याचे प्रकाशक पद्मावती प्रकाशन, नागपूर हे आहेत. डॉ. विजया विलास जोशी या एम्.ए.,एम्.फिल्., पीच्.डी (संस्कृत) इत्यादी पदवींनी विभूषित आहेत. अनेक मासिकांमध्ये, दैनिकांमध्ये त्यांचे ललितलेख आणि संशोधनपर लेख तसेच समीक्षणात्मक लेख प्रसिद्ध आहेत. आकाशवाणीच्या संस्कृत आणि मराठी कार्यक्रमांमध्ये यांचा सहभाग आहे. महोदयांना निबंध लेखनासाठी महाराष्ट्र स्तरीय पुरस्कार प्राप्त आहे. महोदया विश्व संस्कृत प्रतिष्ठान वाराणसी या संस्थेच्या नागपूर शाखेच्या अध्यक्षा आहेत. संस्कृत भाषा प्रचारिणी सभा, विदर्भ साहित्य संघ इत्यादी संस्थांच्या त्या आजीव सदस्य आहेत. २००१ मध्ये महोदयांना ज्ञानवर्धीनी सेवा पुरस्कार या पुरस्काराने गौरविण्यात आले आहे. भोसला वेदशास्त्र महाविद्यालय, एल.ए.डी. सी.ॲण्ड बेरार महाविद्यालय इत्यादी विविध महाविद्यालयांमध्ये महोदयांनी अध्यापनाची धुरा सांभाळली आहे. संस्कृत निबंध सोपान, प्रयास, गीतनिनाद, भक्तीगंध, अधिकाश्रयः, आपली ऋषी इत्यादी महोदयांची प्रस्तुत पुस्तके आहेत.

प्रस्तुत पुस्तकात आद्य शंकराचार्य, समर्थ रामदास स्वामी आणि स्वामी विवेकानंद या तीन संन्यासी विद्वानांनी जनहितार्थ केलेलं कार्य संक्षिप्त रूपाने वर्णिलेलं आहे.

अशाप्रकारे नागपूरात २००१-२०१९ या १८ वर्षात भरपूर संस्कृत बालसाहित्य निर्माण झाले आहे. त्याचबरोबर प्रहेलिकाशतकम् आणि काबुलीवाला ही दोन पुस्तके बालकांसाठीच लिहिण्यात आलेली आहेत. त्यांचा अंतर्भाव अनुक्रमे लघुकाव्ये आणि अनुवादित साहित्य या प्रकरणांमध्ये केलेला आहे.

□□□



**प्रकरण सातवे**

# अनुदित साहित्य

आपला भारत देश अनेक भाषांनी परिपूर्ण असा देश आहे. भारतातील बऱ्याच भाषा आपल्याला कदाचित माहित देखील नसतील परंतु सगळ्या भाषांची जननी संस्कृत भाषा आहे असे मानल्या जाते. ह्या संस्कृत भाषेचा प्रचार, प्रसार आणि विस्तार करण्यासाठी अनेक लेखक लेखिका कटिबद्ध आहेत. आज आधुनिक तंत्रज्ञानामुळे विश्व संकुचित झाले आहे. ज्ञानाच्या कक्षा रुंदावल्या आहेत. एका भाषेतील साहित्य आणि विचार अन्य भाषांमध्ये अनुवादीत करण्याच्या कार्याला अतिशय महत्त्व आणि वेग आला आहे. संस्कृतच्या क्षेत्रात देखील अनुवादाचे हे कार्य होत आहे असे आढळते. संस्कृत ग्रंथाचे अन्य भाषांमध्ये अनुवाद आणि अन्य भाषीय साहित्याचा संस्कृतात अनुवाद असे हे दुहेरी कार्य आहे. ह्यापैकी नागपूरातील अभ्यासकांनी केलेल्या अन्य भाषीय ग्रंथांच्या संस्कृत अनुवादांचा विचार प्रस्तुत प्रकरणात केलेला आहे.

**कथा संग्रह**

१) जालकिरणाः

२) जगदा

**कादंबरी**

१) शामस्यमाता

२) अभिशप्तम् पुष्पम्

**चरित्रग्रंथ**

१) गुलाबरावमहाराजचरितम्

**नाट्यकृती**

१) रसरङ्गः

## कथासंग्रह

### १) जालकिरण :

हा कथासंग्रह डॉ. विजया रामचंद्र जोशी ह्यांन अनुवादित केलेला आहे. त्यांचा जन्म ७/११/१९४१ साली नागपूर येथे झाला. त्या धरमपेठ कला वाणिज्य विभागातून संस्कृत विभागप्रमुख या पदावरून सेवानिवृत्त झाल्या आहेत. १९८८ साली 'काव्यप्रकाशस्य टीकाकाराः एकम अध्ययनम्' ह्या विषयात आचार्य ही उपाधी त्यांनी मिळवलेली आहे. त्यांनी स्नातकोत्तर संस्कृत विभागात अंशकालीन अध्यापन केले आहे. आकाशवाणीच्या विविध संस्कृत कार्यक्रमात त्यांचा सहभाग उल्लेखनीय आहे. विविध संस्कृत परिषदांमध्ये त्यांनी शोध निबंधांचे वाचन केले आहे. लहान मुलांसाठी पुस्तके लिहिली आहेत तसेच संपूर्ण विदर्भात संस्कृत भारती या संस्थेमध्ये ९ वर्षे अध्यापन कार्य केलेले आहे. संस्कृत भवितव्यम् ह्या साप्ताहिकात त्या नियमित लेखन करीत असतात. त्यांची प्रकाशित पुस्तके :

१) जालकिरणा : (संस्कृत कथा संग्रह)
२) अमृत कलश संस्कृताचा (शोध निबंध संग्रह)
३) संस्कृत बालनाट्य संवादा :
४) मृच्छकटिकम् (संपादन व मराठी अनुवाद)
५) श्रमगीता (मराठी अनुवाद)
६) वात्सल्यरसानयन् (मराठी अनुवाद)

प्रस्तुत लघुशोध प्रबंधाच्या कालमर्यादेत केवळ जालकिरणाः हे एकमेव पुस्तक अंतर्भूत होते. त्यामुळे केवळ ह्या एकाच पुस्तकाचा विचार केलेला आहे.

**'जालकिरणाः'**

हा कवडसे ह्या मराठी कथा संग्रहाचा अनुवाद आहे. कवडसे कथासंग्रहाच्या मुळ लेखिका सौ. शिल्पा धर्माधिकारी (नागपूर) ह्या आहेत. ह्या पुस्तकाचा जालकिरणाः हा संस्कृत अनुवाद जून २०१० रोजी प्रकाशित झाला. ह्याचे प्रकाशन संस्कृत भाषा प्रचारिणी सभा नागपूर या संस्थेने केले आहे.

ह्या कथासंग्रहात केवळ १६ कथा आहेत. डॉ. जोशी महोदयांनी ह्या १६ कथा अनुवादित करताना अतिशय सोप्या भाषेत केलेल्या आहेत. कथांमध्ये संभाषणे देखील घेतलेली आहेत. संभाषणांमुळे त्या वाचण्यास मनोरंजक वाटतात. ह्या पुस्तकाला एकूण ४२ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर हिरव्या गार वाटेचे चित्र तर पृष्ठभागावर



लेखिकेचा परिचय दिलेला आहे. मनुष्य स्वभावाचे सूक्ष्म निरीक्षण येथे प्रत्येक ठिकाणी आपल्याला दिसते. सर्वच कथा आपल्या दैनंदिन अनुभवाशी संलग्न असल्याने त्या वाचतांना गंमत वाटते. एक कोणतातरी प्रसंग घेवून तो रंगवून त्या अनुशंगाने काहीतरी उपदेश किंवा मार्गदर्शन करण्याची मुळ मराठी पुस्तकाला कुठेही धक्का न लावता लेखिकेने केलेला हा संस्कृत अनुवाद संस्कृत कथा साहित्यात आपले आगळे वेगळे स्वरू निश्चितच कायम ठेवतो.

### २) जगदा :

श्रीमती मुथ्थु, मीनाक्षीद्वारा अनुवादित कथांचा संग्रह 'जगदा' आहे. प्रजाशक्ती डेली प्रिटींग प्रेसद्वारा २०१५ साली हा अनुदितकथा संग्रह प्रकाशित झाला.

ह्या अनुदित कथासंग्रहात एकूण ७ कथा आहेत. प्रथम 'दुःखम्' ह्या कथेत अतिविश्वासाचा परिणाम काय होतो हे वर्णिले आहे. द्वितीय 'बालिका' ह्या कथेत सावित्री नावाच्या दुर्भागी मुलीची दुरावस्था वर्णिली आहे. ''बोन्सायूच्छाया'' ह्या कथेत एक मनोवैज्ञानिक १२वी तल्या मुलाचे मन कसे जाणतो ते आले आहे.'पश्चनिमिष' ह्या कथेत दुर्भाग्यपूर्ण स्त्रीची कथा आली आहे. 'सः च कश्चन कालः' भारतीयांची मनोवेदना विर्णते। जगदरा ह्या मेहनती, विश्वासू अशा मुलीची कथा 'जगदा' ह्या कथेत आली आहे. ' ते कुत्र' ही सातवी कथा अतिशय वाचनीय आहे.

अनुदित कथांची भाषा सोपी आहे. कथांमध्ये संवादशैलीचा अंतरभाव आढळतो. ज्यामुळे कथा वाचकाला खिळवून ठवेतात. भाषेत ओघ असल्याकारणाने कथेत पुढे काय ही ओढ रसिक वाचकाला नेहमीच आकर्षित करते.

ह्या अनुदित कथा संग्रहाने संस्कृत साहित्यात मोलाची भर घातली आहे.[२]

## कादंबरी

### १) शामस्य माता

ही अनुदीत कादंबरी असून ह्याच अनुवाद डॉ. मंजूषा पंढरीनाथ कुलकर्णी ह्यांनी केला आहे. डॉ. मंजूषा कुळकर्णी संस्कृत विषयातील स्नातकोत्तर पदवी तसेच पी.एच.डी ह्या पदवींनी अलंकृत आहेत. विद्यारत्न ह्यांसारखे अनेक पुरस्कार त्यांना प्राप्त झालेले आहेत. सांप्रत त्या मराठवाडा विद्यापीठात संस्कृत प्राध्यापिका आहेत.

डॉ. कुळकर्णी ह्यांची खालील पुस्तके प्रकाशित आहेत.

१) विवाह संस्कार

२) स्मृति वचनानि

३) श्यामस्य माता

ही मुळ कादंबरी मराठी भाषेतील आहे. हिचे मुळ लेखक पांडुरंग सदाशिव साने म्हणजे लोकप्रिय मराठी लेखक साने गुरुजी आहेत. ह्या संस्कृत अनुवादाचे/ श्यामस्य माताचे प्रकाशन संस्कृत भारती नवदहेली हे आहेत. ह्याचे ह्या कादंबरीला एकूण १९७ पृष्ठे आहेत. ही कादंबरी बंगलोर येथे विश्व संस्कृत मेळ्यात प्रकाशित झाली आहे.

अनुदीत असलेल्या ह्या कादंबरीत साने गुरुजींच्या आत्मचरित्रपर कथा आहेत. ह्या स्मरण कथा लहान मुलांसाठी बोधपर, संस्कारक्षम, मातृस्नेहसंवर्धक आणि ज्येष्ठांसाठी बाल्यकाल स्मारक आहेत.

हा श्याम रोज रात्री आपल्या मित्रांना त्याच्या स्मृतीकथा सांगतो. म्हणून (श्यामची आई) 'श्यामस्य माता' ह्या पुस्तकातील प्रकरण 'रात्रि' ह्या नावाने निर्दिष्ट केलेली आहे. ह्यातील सगळ्या कथा ह्या शामच्या जीवनावर आधारीत आहेत. श्यामने स्वमातेच्या उदात्त आचरणातून जीवनाचे सुशिक्षण घेतले.

'शामस्य माता' हे पुस्तक आङ्गल अधिपत्याखाली असलेले महाराष्ट्रातील कोकण प्रांतातील ग्रामीण भागात राहणाऱ्या एका ब्राह्मण कुटुंबाचे कथानक आहे. ह्या पुस्तकात आईच्या विवाहापासून ते तिच्या मृत्यूपर्यंतचा कथाभाग आहे. प्रत्येक प्रसंगात श्यामची आई श्यामला सद्वर्तन कसे शिकविते हे आले आहे.

ह्या अनुवादाने मराठी साहित्य रसिकांना संस्कृताचा आस्वाद देखील घेता येईल. असे हे अनुदित साहित्य डॉ. मंजुषा कुळकर्णी ह्यांनी लिहिलेले आहे. त्यांनी पुस्तकाचा मुळभाग जपून सरळ संस्कृतात त्याचा अनुवाद केला आहे. मूलग्रंथाचे भाषावैभव, रसवैभव, संवादवैभव, वर्णनवैभव मूलवत् धरूनच हा अनुवाद आहे.[१]

### २) अभिशप्तम् पुष्पम

ही अनुवादीत कादंबरी असून ह्याचा अनुवाद सौ. मंजूषा चन्ने (ठेमदेव) यांनी केलेला आहे. डॉ. मंजूषा चन्ने ह्या एम्.ए. आणि संस्कृत आचार्य ह्या उपाधींनी अलंकृत आहेत. अविरत संस्कृत संभाषण आणि संस्कृत लेखन ह्यासाठी त्या ख्यातनाम आहेत.



ह्या कादंबरीच्या मूळ लेखिका डॉ. कृष्णा श्रीवास्तव आहेत. मूळ पुस्तक हिंदी भाषेत आहे. ह्या उपन्यासाला महाराष्ट्र हिंदी साहित्य अकादमीने मुंशी प्रेमचंद पुरस्कारानी पुरस्कृत केलेले आहे.

आपल्या भारतदेशाची भूमी ही वीरांची आणि स्वामीनिरष्ठांची भूमी आहे हे सर्वज्ञातच आहे. ह्या भूमीवर फक्त वीर पुरुषच नव्हे तर वीर स्त्रिया देखील होवून गेल्या आहेत.

अशाच एका वीरांगनेची गाथा येथे वर्णिली आहे. मेवाडच्या राजपुत्राची दायी पन्ना हिची स्वामीनिष्ठा आणि राजपुत्राच्या रक्षणासाठी तिने आपल्या निष्पाप पुत्राचा चंदनाचा दिलेला बळी ह्यांची ही कथा आहे. तिचे वागणे आपल्याला निःशब्द करते. ती कर्तव्यदक्ष माता कठोर हृदयाने स्वतःच्या डोळ्यासमोर स्वपुत्राचे चंदनाचे बलिदान देते. त्यावेळेची चंदनाची स्थिती देखील हृदयद्रावक होते.

अशी ही मेवाडची पन्ना दायी इतिहासात स्वतःच्या त्यागाने सुविख्यात आहे. चंदनाची मनोव्यथा ह्या कादंबरीत आकर्षकरित्या वर्णिली आहे.

सौ. मंजूषा चन्ने ह्यांचा हा प्रयास स्तुत्य आहे. ह्या पुस्तकाचे प्रकाशन संस्कृत भारतीने २०११ मध्ये बंगलोर येथे विश्व संस्कृत मेळ्यात केले आहे.

संस्कृत साहित्यात प्रदीर्घ कथा म्हणजे कादंबरी हा साहित्य प्रकार फारसा आलेला नाही. त्या दृष्टीने विचार करता डॉ. मंजूषा चन्ने ह्यांचा हा उपक्रम अभिनंदनीय आहे. ह्याव्यतिरिक्त डॉ. मंजूषा चन्ने ह्यांनी आणखी एका पुस्तकाचा संस्कृतानुवाद केला आहे पण ते पुस्तक उपलब्ध होऊ शकले नाही.

## नाट्यकृति

### १) मोहवनम् :

हे अनुवादित संस्कृत नाटक डॉ. लीना रस्तोगी ह्यांनी लिहिलेले आहे. ह्या नाटकाच्या मुळ लेखिका सौ. सुधा पांढरे आहेत. ह्या नाटकाचा प्रयोग २००८ साली प्राच्य विद्या परिषद कविकलुगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, वसंतराव देशपांडे सभागृह, नागपूर येथे झाला. तसेच २००८ साली महाराष्ट्र राज्य संस्कृत नाट्य स्पर्धा, मुंबई येथेही झाला. इ. स. २०१० साली अखिल भारतीय-नाट्यमहोत्सवात (सागर) येथेही ह्याचा प्रयोग झाला. इ.स. २००८ साली महाराष्ट्र राज्य संस्कृत नाट्य स्पर्धेत ह्या नाटकाला नाट्यप्रयोगासाठी आणि दिग्दर्शनासाठी द्वितीय क्रमांकाचे बक्षीस मिळाले.

**कथानक :**

मोहवनम् ही एकांकीका आहे. हिचा विषय अगदी आजच्या पिढीतील आहे. एका छात्रावासाचे चित्र यात रेखाटले आहे. तेथील भ्रष्ट द्वारपालिका, कर्तव्यदक्ष निरीक्षिका आणि उन्मत्त मुली यांचे व्यवहार येथे दाखविण्यात आले आहे. तारुण्यात असलेले पुरुषांचे आकर्षण कसे घातक असते हे अगदी थोड्या कालावधीत अतिशय सुंदररित्या येथे दाखवलेले आहे.

माता पित्यांच्या पैशावर चैन करणाऱ्या आणि बेजबाबदारपणे वागणाऱ्या युवक-युवतींचे चित्रण येथे अतिशय सुंदर पद्धतीने केले आहे.

यामधील सर्वच पात्रे अत्यंत सजीव आहेत. ही नाटिका सद्य परिस्थितीशी संबंधित असल्यामुळे रसिकांना अधिक जवळची वाटते. परंपरागत पौराणिक विषयांना चिटकून न राहता आधुनिक समस्येचे दर्शन घडविणारी ही नाटिका मनोरंजक आणि बोधप्रद आहे. अनुवाद करतांना डॉ. रस्तोगी ह्यांनी अगदी सोप्या आणि सुपरिचित अशा संस्कृत शब्दांचा उपयोग केल्यामुळे नाटिका समजावयास सोपी झाली आहे.

### २) बंडु अभिनयं करोति :

ह्या नाटकाचे मुळ लेखक कै. प्रा. गंगाधर गाडगीळ हे होते. ह्याचे एकूण ७ प्रयोग झाले. २००९ साली संस्कृतभारती संभाषण शिबिर गीतामंदिर, नागपूर आणि प्राच्य विद्या परिषद वसंतराव देशपांडे सभागृह, नागपूर येथे झाले. तर २०१२ साली अखिल भारतीय नाट्यमहोत्सव-अगरतला, त्रिपुरा आणि अखिल भारतीय नाट्यमहोत्सव, सागर विश्वविद्यालय सागर येथे झाले. २०११ साली महाराष्ट्र राज्य नाट्य स्पर्धा, रविंद्र नाट्य मंदि, मुंबई येथे एक प्रयोग झाला. तर इ.स. २०१२ साली अखिल भारतीय नाट्यस्पर्धा, सोमनाथ विद्यापीठ, गांधीनगर, गुजरात येथे ह्या नाट्यप्रयोगाला प्रथम पारितोषिक मिळाले. इ.स. २०१२ साली कालिदास पर्व कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, सायंटिफिक सभागृह, नागपूर येथेही झाला.

**कथानक :**

कथानकाचा विषय आधुनिक आहे. कथानकाचा नायक बंडु आणि त्याची पत्नी, त्याची कार्यालयातील सहकारिणी मृदुला ह्यांच्या भोवती हे नाटक गुंफलेले आहे. नाटकाची भाषा सोपी आहे पण नाटकाच्या कथानकाचा कुठेही पत्ता नाही.



कोणतेही नैतिक मूल्य नाही. त्यामुळे फोर्स ह्या प्रकारात ही एकांकिका येत असली तरी ती फारशी मनोरंजक वाटत नाही. त्याच त्याच वाक्याची पुनरावृत्ती नायकाचे फारसे तथ्य नसलेले संवाद निरस वाटतात. नाटकाची भाषा सोपी आहे.

### ३) गृहहीन

मूळ रचना सौ. प्रतिभा कुळकर्णी ह्यांची आहे. ह्या नाटकात एकूण ७ पात्रे आहेत.

ह्या नाटकाचे प्रयोग इ.स. २०१२ साली महाराष्ट्र राज्य नाट्य स्पर्धा नागपूर आणि अखिल भारतीय नाट्य स्पर्धा गुजराथ येथे झाले तसेच महाराष्ट्र राज्य नाट्य स्पर्धा अमरावती येथे ही ह्या नाटकाचा प्रयोग झाला आहे.

**कथानक :**

ह्याचे कथानक आजच्या काळातील आहे. नाटकाचा नायक श्रीकांत हा एक साधा भोळा तरुण आहे. आई आणि पत्नी ह्या दोघींकडूनही अपमानीत झालेला तो शेवटी बेघर होतो. असाहाय होतो हे या नाटिकेमध्ये अतिशय सुंदर पद्धतीने चित्रित केले आहे. मुळ कथानकात डॉ. रस्तोगी ह्यांनी कुठेही बदल केलेला नाही. नाटकाची भाषा साधी सरळ आहे. संवाद सुटसुटीत आहेत. पारंपारिक संस्कृत नाटकांच्या कक्षा ओलांडणारे हे आधुनिक नाटक प्रेक्षकांच्या पसंतीस निश्चितच उतरणारे आहे.

### ४) विकसतु एषा कलिका

मुळ रचना गजानन पांडे ह्यांची आहे. एकूण ६ पात्री नाटक आहे. निर्मिती संस्कृतभाषा प्रचारिणी सभा ह्यांची आहे. त्यांचे प्रयोग एल.ए.डी. महाविद्यालय, नागपूर अखिल भारतीय नाट्य महोत्सव-अगरतला, त्रिपुरा आणि कालिदास पर्व -कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, नागपूर येथे झाले आहे.

**कथानक :**

ही नाटिका आजच्या ज्वलंत समस्येवर आधारीत आहे. मुलींची असुरक्षितता त्यांच्यावर होणारे बलात्कार या समस्येला स्पर्श करणारी ही नाटिका अतिशय मनोवेधक आहे. मैत्रिणीवर झालेल्या बलात्काराची घटना पाहून विचलित झालेली मनस्वास्थ्य गमावलेली ह्या नाटकाची नायिका मीना तिची आई, आजी, पोलिस अधिकारी ह्या सर्वांचे चित्रण ह्या नाटिकेत अतिशय उत्तमरितीने केले आहे. अनुवाद

करतांना मुळ कथानकाला धक्का न देण्याची खबरदारी डॉ. रस्तोगी यांनी घेतलेली आहे. नाटकाची भाषा अतिशय साधी आहे. संवाद अतिशय उस्फूर्त वाटतात. एकूणच ही नाटिका प्रेक्षकांना विशेषतः तरुण प्रेक्षकांना खिळवून ठेवणारी आहे.

ही सर्व नाटके २०१२ पर्यंत अप्रकाशित रूपात होती. पण त्यांचे रंगभूमीवर प्रयोग झाले होते आणि त्यांनी पुरस्कार प्राप्त केले होते. म्हणून त्यांचा अंतर्भाव येथे केलेला आहे. योगायोगाने इ.स. २०१३ साली उज्जैन येथे झालेल्या संस्कृत साहित्य उत्सवात ह्या नाटकांचा संग्रह प्रकाशित झाला.

या सर्व अनुदित नाटकांचे संकलन डॉ. लिना रस्तोगी यांनी रसरङ्गः या पुस्तकात केले आहे. हे पुस्तक २०१३ साली संस्कृत भारतीतर्फे दिल्ली येथे प्रकाशित झाले आहे.

### ५) काबुलीवाला

हे अनुदित रुपक श्रीमती दुर्गा पारखी ह्यांनी अनुदित केले आहे. ह्याचे मुळ लेखक महाकवी रविंद्रनाथ टागोर हे आहेत. काबुलीवाला ही गुरुदेव डॉ. रविंद्रनाथ टागोर ह्यांची कादंबरी अत्यंत लोकप्रिय आहे. ह्या कादंबरीचे मराठी नाट्य रुपांतर नागपूरातील एक श्रेष्ठ नाट्यकर्मी श्री. रंजन दारव्हेकर ह्यांनी केले होते. त्या मराठी नाट्यरुपांतराचा संस्कृत अनुवाद सौ. दुर्गा पारखी ह्यांनी केला आहे.

श्रीमती दुर्गा पारखी ह्या राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाच्या वाङ्मय पारंगत (संस्कृत) आहेत. त्या सुवर्णपदकासह संस्कृतात एम.ए. आणि एम.फिल झालेल्या आहेत. त्या सेवानिवृत्त संस्कृत शिक्षिका आहेत. त्या राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठांशी तसेच कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठाशी संबंधित आहे.

काबुलीवाला ह्या रुपकाचे मुळ कथानक असे आहे की कोणी एक व्यापारी स्वतःचा काबूल देश सोडून भारतात उपजीविकेसाठी येतो आणि द्राक्षादी फळ विकतो. मुळतःच आई नसलेला आणि स्वतःच्या अल्पवयीन मुलीची आठवण येत असलेल्या ह्या काबुलीवाल्याचे पितृहृदय येथे वर्णिले आहे. स्वतःच्या मुली एवढी मुलगी पातो तिच्यावर वडिलांप्रमाणे प्रेम करतो. सुरुवातीला त्याला लोक अपराध्याच्या नजरेने पाहतात आणि नंतर त्याचे पितृहृदय जाणतात असा सगळा कथाभाग येथे आलेला आहे.



ह्या पुस्तकात एकूण २२ पृष्ठे आहेत. मुखपृष्ठावर काबुलीवाला आणि एक लहान मुलगी ह्यांचे चित्र आहे तर मलपृष्ठभागावर श्रीमती दुर्गा पारखींचा परिचय आहे. प्रकाशक श्री. अरविंद पारखी हे आहेत. बालसाहित्य असल्या कारणाने कुठेही भाषेत क्लिष्टता नाही. भाषा परिवर्तने कुठेही भावपरिवर्तन झालेले नाही. मुष्टामुष्टी, केशाकेशि, शब्दाशब्दि अशा शब्दांचा येथे प्रयोग दिसून येतो. त्याचप्रमाणे मिने, मिनटले असा मराठी भाषिक प्रयोगही आढळतो.

त्याचबरोबर श्रीमती दुर्गा पारखी, डॉ. हंसश्री मराठे, डॉ. वीणा गानु, डॉ. मंजूषा चन्ने इ. विदुर्षींनी मराठी भाषेतील काही लघुकथांचे संस्कृतानुवाद केले आहेत आणि ते संस्कृत भवितव्यम् या साप्ताहिकातून प्रकाशित झालेले आहे.

असे हे अनुवादित संस्कृत साहित्य नागपूरात निर्माण झाले आहे. त्यामध्ये नाटकांची संख्या अधिक आहे असे जाणवले. या सर्वच नाटकांचे प्रत्यक्ष प्रयोग झाले आहेत. महाराष्ट्र शासनाच्या राज्यस्तरीय संस्कृत नाट्य स्पर्धांमध्ये त्यांना विविध पुरस्कार प्राप्त झाले आहेत हे विशेष उल्लेखनीय आहे. काव्यांचा किंवा पद्यग्रंथाचा संस्कृतानुवाद करण्याकडे संस्कृत विद्वानांचा फारसा कल दिसत नाही. या सर्व अनुवादित संस्कृत साहित्यामुळे अन्य भाषांमधील साहित्य संस्कृतात आल्यामुळे संस्कृत साहित्य भांडार अधिक समृद्ध झाले आहे.

## चरित्रग्रंथ

**१) स्वयंसिद्ध : प्रज्ञाचक्षु : श्री गुलाबराव महाराज** हे पुस्तक डॉ. लीना रस्तोगी ह्यांनी लिहिलेले आहे. डॉ.लीना रस्तोगी ह्यांचा जन्म २८/०७/१९३९ मध्ये झाला. त्या संस्कृत, पाली, प्राकृत तसेच मराठी भाषेत एम.ए. आहेत. तसेच संस्कृतमध्ये पी. एचडी. देखील आहेत. त्या उमरेड येथून संस्कृत विभाग प्रमुख तसेच संस्कृत प्रपाठिका म्हणून निवृत्त झाल्या. त्यांची श्रीगुलाबराव महाराज (मराठी) स्पंदने (मराठी), दिठिपल्याड (मराठी कविता, सांङ्ख्यतत्त्वदीपिका (मराठी भाष्य), ही मराठी पुस्तके प्रकाशित आहेत. श्री गुलाबराव महाराज हे मराठी पुस्तक प्रकाशित आहे. त्याचा त्यांनी स्वतःच केलेला संस्कृत अनुवाद स्वयंसिद्धः प्रज्ञाचक्षुः श्रीगुलाबरावमहाराजः हे पुस्तक होय. ह्याला एकूण ६४ पृष्ठे आहेत. ह्या पुस्तकाच्या मुलपृष्ठावर प्रज्ञाचक्षु गुलाबराव महाराजांचे चित्र आहे तर पृष्ठभागावर डॉ. लीना रस्तोगी ह्यांची माहिती दिली आहे. ह्याचे प्रकाशन संस्कृत भारतीने केले आहे.

डॉ. लीना रस्तोगींनी हे पुस्तक संस्कृतानुरागींना समर्पित केले आहे.

महाराजांचे विचार संपूर्ण भारतात प्रस्तुत व्हावे ह्या इच्छेने डॉ. रस्तोगींनी महाराजांचे संस्कृतात चरित्रलेखन केले आहे. सगळ्यांना वाचायला सरलता यावी म्हणून भाषा अगदी सोपी घेतलेली आहे. आचार्य स्वामी गोविंददेव गिरि ह्यांचे मंगलाचरण या पुस्तकाला लाभलेले आहे. तीन विभागात विषयांची मांडणी केली आहे. १) जीवनगाथा २) पांचलतिक दर्शन ३) साहित्यकृति.

गुलाबराव महाराजांचा सम्यक परिचय करून देणारे हे पुस्तक अत्यंत वाचनिय आहे. डॉ. लीना रस्तोगी गुलाबराव महाराजांच्या परमभक्त आहेत. त्याचप्रमाणे त्यांच्या साहित्याचा आणि तत्त्वज्ञानाचा त्यांनी सखोल अभ्यास केलेला आहे. हे प्रस्तुत पुस्तक वाचतांना प्रकर्षाने जाणवते आणि गुलाबराव महाराज व डॉ. लीना रस्तोगी ह्या दोघांसमोर मस्तक आदराने आपोआप नत होते.

□□□



### प्रकरण आठवे

# उपसंहार

संस्कृत साहित्य हा आपल्याला आपल्या पूर्वजांकडून प्राप्त झालेला अनमोल वारसा आहे. आपण भारतीयांनी तो वारसा आदरपूर्वक आणि आत्मीयतेने केवळ जपून ठेवला असे नव्हे तर त्यात मौलिक भर देखील घातली. वेद काळापासून अगदी या क्षणापर्यंत अनेक प्रतिभासंपन्न कवींवर आपल्या लेखणीने संस्कृत साहित्य सरस्वतीची अखंड उपासना करीत आहेत. आणि हे कार्य सृष्टीच्या अंतापर्यंत असेच अविरत सुरु राहणार आहे यात शंका नाही. या कार्यात नागपूर वासीयांचा देखील सिंहाचा वाटा आहे. भारताच्या मध्यभागी असलेले महाराष्ट्राची उपराजधानी असलेले भौगोलिक दृष्ट्या अत्यंत सुरक्षित आणि ३०० वर्षांच्या सांस्कृतिक इतिहासाने संपन्न असलेले नाग नगर आम्हां सर्वांचे एक अभिमानाचे स्थान आहे. प्रत्येक क्षेत्रात सदैव पुढे पाऊल टाकणारे हे नागपूर संस्कृत साहित्य निर्मितीच्या क्षेत्रात देखील सदैव अग्रेसर राहिले आहे. पण विस्तार भयास्तव नागपुरात निर्माण झालेल्या सर्व संस्कृत साहित्य कृतीचा विचार न करता केवळ इ.स.२००१ ते २०१९ या १८ वर्षांच्या काळात नागपूरात निर्माण झालेल्या संस्कृत साहित्य कृतींचा विचार प्रस्तुत पुस्तकात केलेला आहे. या काळात नागपुरात निर्माण झालेल्या या संस्कृत साहित्य कृतींचा शोध घेतला असता अनेक साहित्य कृती अभ्यासासाठी प्राप्त झाल्या. या सर्वांचा आणि त्यांच्या रचनाकारांच्या संक्षिप्त परिचय प्रस्तुत पुस्तकात दिलेला आहे. कारण प्रत्येक साहित्य कृतीचे सविस्तर विवेचन सर्वथा अशक्य आहे.

नागपूरात निर्माण झालेल्या संस्कृत साहित्य कृती विविध प्रकारच्या आहेत. त्यात महाकाव्ये, लघुकाव्ये, स्फुटकाव्ये, कथा, बालसाहित्य आणि अनुवादित साहित्य ह्या सगळ्यांचा अंतर्भाव आहे. ह्या प्रत्येक प्रकारच्या विविध साहित्य

कृती नागपुरातील प्रतिभासंपन्न संस्कृततज्ञांनी निर्माण करून संस्कृत सरस्वतीचे गर्भगृह अधिक समृद्ध केले आहे.

या अध्ययनाने पुढीलप्रमाणे निष्कर्ष काढणे शक्य झाले.

**निष्कर्ष –**

१) संस्कृत रचनेच्या क्षेत्रात नागपुरातील संस्कृत परिवार अजिबात मागे नाही.

२) अनेक प्रतिभासंपन्न संस्कृत कवीवर नागपूरला भूषवीत आहेत.

३) नागपुरातील संस्कृत कवी महाकाव्ये, लघुकाव्ये, स्फुटकाव्ये, कथासाहित्य, बालसाहित्य, नाटके, अनुवादित साहित्य अशा सर्व प्रकारच्या साहित्याची निर्मिती करीत आहेत.

४) नागपुरात संस्कृत बालसाहित्य भरपूर प्रमाणात निर्माण झाले आहे. लहान मुलांना संस्कृत अध्ययनाकडे आकृष्ट करण्यासाठी हे बालसाहित्य अत्यंत उपयुक्त ठरणारे आहे.

५) नागपुरातील संस्कृत कवींना स्फुट रचनांमध्ये अतिशय रुचि आहे. कारण अत्यंत साध्या सरळ स्फुट रचना गत दशकात फार मोठ्या संख्येने करण्यात आलेल्या आहेत.

६) इतर भाषेतील ग्रंथांचा संस्कृतात अनुवाद करण्याचे कार्य नागपुरात अतिशय वेगाने होत आहे. त्यामुळेच श्यामची आईसारखी प्रसिद्ध मराठी पुस्तके वाचकांना संस्कृतात उपलब्ध झालेली आहेत.

७) गेल्या १८ वर्षात नागपुरात निर्माण झालेले साहित्य बहुतांशी स्त्रियांनी रचलेले आहे किंवा नागपुरात संस्कृत लेखिकांची संख्या अधिक आहे असे म्हणावेसे वाटते.

८) ह्या संस्कृत कवयित्री महाकाव्य रचनेकडे मात्र फारश्या वळलेल्या दिसत नाहीत. ते कार्य केवळ श्रीमती लीलाशास्त्री आर्वीकर ह्यांनी केले आहे. आणि अन्य २ महाकाव्यांचे रचनाकार डॉ. मधुसूदन पेन्ना आहेत.

९) संस्कृत नाट्य निर्मितीच्या क्षेत्रात नागपूर प्रगतीपथावर आहे. यामध्ये मुळ नाट्यरचना आणि अनुवादित नाटकांचा अंतर्भाव आहे.

१०) नागपुरात निर्माण झालेल्या सर्व संस्कृत रचना अत्यंत प्रासादिक आहेत.

११) नागपुरातील सर्वच संस्कृत रचनाकारांची भाषा अत्यंत सोपी आणि मधुर आहे. पल्लेदार वाक्ये सामासिक रचना आणि अलंकारांचे अवडंबर ह्या सर्वांना त्यात फारसे स्थान नाही.

१२) ह्या सर्वच संस्कृतरचना संस्कृतचा प्रचार करण्यासाठी निर्माण झाल्या आहेत असे वाटते.

१३) ह्या सर्वच रचनांच्या प्रकाशनाच्या कार्यात कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय आणि संस्कृत भाषा प्रचारिणी सभा ह्यांचा सिंहाचा वाटा आहे. काही रचना कविंनी स्वतःच प्रकाशित केलेल्या आहेत. अन्य प्रकाशक या कार्यासाठी फारसे पुढे आलेले दिसत नाहीत.

१४) अभ्यासिलेली सर्वच पुस्तके आकर्षक आणि रंगीत अशा मुखपृष्ठाने सुशोभित झालेली आहे. बहुतांश पुस्तकांच्या मलपृष्ठांवर लेखकाचा संक्षिप्त परिचय आहे. म्हणजेच आधुनिक प्रसिद्धी तंत्राचा जवळ जवळ सर्वच लेखकांनी उपयोग करून घेतलेला आहे. काही रचनांमध्ये आतल्या भागात रंगीत चित्र घातलेली आहे. त्यामुळे ती पुस्तके अधिक आकर्षक वाटतात.

१५) गेल्या १८ वर्षात नागपूरने संस्कृत साहित्य भंडारात मोलाची भर घातलेली आहे.

गत वर्षात नागपुरात निर्माण झालेले सर्व संस्कृत साहित्य अतिशय आकर्षक आणि अभ्यासनीय आहेत. या साहित्य कृतिबरोंबरच काही संस्कृत शास्त्रीय ग्रन्थदेखील याच काळात नागपूरात निर्माण झाले आहेत. पण त्यांच्यापेक्षा या ललित साहित्य कृतींची संख्या अधिक आहे. संस्कृतानुरागी लोकांना नागपुरात निर्माण होणाऱ्या संस्कृत काव्य कृतीचा संक्षेपाने परिचय करून देण्यास प्रस्तुत पुस्तक निश्चितच उपयोगी पडेल आणि त्यांच्या मनात या काव्यकृतीचा रसास्वाद घेण्याची इच्छा निर्माण होईल असा विश्वास वाटतो.

□□□

**प्रकरण नववे**

# संदर्भ ग्रंथ सूची

| ग्रंथ | लेखक | प्रकाशक | प्रकाशन वर्ष |
|---|---|---|---|
| १. अर्वाचिन संस्कृत साहित्य | डॉ.श्री.भा. वर्णेकर | मॉर्डन बुक स्टोअर्स | १९६३ |
| २. अभिशप्तम् | डॉ.मंजुषा चन्ने | संस्कृत भारती | २०११ |
| ३. अभितः परितः | डॉ.सौ.प्रज्ञा देशपांडे | श्री रेणुका प्रकाशन | २०१३ |
| ४. आवेदनम् | डॉ.मधुसूदन पेन्ना | देववाणी परिषद, दिल्ली | २००२ |
| ५. आधुनिक राजकीय नेतारः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ६. आध्यात्मिक महापुरुषः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ७. कलाविदः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ८. कथामृतम् | डॉ.शारदा गाडगे | सं.भा.प्र.स.ना. | २०१० |
| ९. कथारत्नावली | डॉ.शारदा गाडगे | सं.भा.प्र.स.ना. | २०१० |
| १०.कथासुमनस्सौरभम् | प्रा.दुर्गा पारखी | सं.भा.प्र.स.ना. | २०११ |
| ११.कथापाथेयम् | डॉ.विभा क्षीरसागर | क.का.सं.वि. | २०११ |
| १२.कथापुष्पावली | डॉ.सौ.शारदा गाडगे | सं.भा.प्र.स.ना. | २०१७ |
| १३.काव्यकण्ठचरितम् | डॉ.मधुसूदन पेन्ना | चिन्मय इंटरनॅशनल रिसर्च फॉउंडेशन, केरल | २०१२ |
| १४.काव्यकण्ठेविजयते | डॉ.मधुसूदन पेन्ना | गुंजारह पत्रिका | २००३ |
| १५.काव्यमधुपर्क | पं.मुरलीधर शास्त्री पाठक | पं. मुरलीधर शास्त्री पाठक | २००५ |
| १६.काबुलीवाला | डॉ.सौ.दुर्गा पारखी | श्री. अरविंद पारखी | २०१० |
| १७.क्रीडानिपुणः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| १८.कूजनम् | डॉ.नी.र.वऱ्हाडपांडे | विजय प्रकाशन | २००७ |
| १९.गुलाबराव महाराज -चरितम् | डॉ.लीना रस्तोगी | सं.भा.प्र.स.ना. | २०११ |
| २०.गृहहीनः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| २२.चिरन्जीविनः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| २३.जगदा | श्रीमती मुत्तु मीनाक्षी | प्रजाशक्ति दैनिकमुद्रणालय | २०१५ |
| २४.जागरा | प्रा.विभा क्षीरसागर | क.का.सं.वि. | २०१६ |
| २५.जालकिरणाः | अनु.डॉ.विजया जोशी | सं.भा.प्र.स.ना. | २०१० |
| २६.तमसोमा ज्योतिर्गमय | डॉ.स्मिता होटे | अप्रकाशित | |
| २७.त्यागधनाः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| २८.देवमानवाः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| २९. नवकथा | डॉ.सौ.शारदा गाडगे | श्री रेणुका प्रकाशन | २०१३ |
| ३०.नरमेधः | डॉ.मधुसूदन पेन्ना | देववाणी परिषद,दिल्ली | २००२ |
| ३१.नाट्यत्रिदलम् | डॉ.स्मिता सुधीर होटे | श्री रेणुका प्रकाशन | २०१३ |
| ३२.प्रहेलिकाशतकम् | सौ.दुर्गा पारखी | सं.भा.प्र.स.ना. | २०११ |
| ३३.परिव्राजकत्रयम् | डॉ. विजया जोशी | पद्मावती प्रकाशन | २०१३ |
| ३४.प्रसिद्धाः वैज्ञानिकाः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ३५.बंडु अभिनय करोति | डॉ.लीना रस्तोगी | अप्रकाशित | |
| ३६.बालरत्नानि | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ३७.बालकथापुष्पहारः | डॉ.सौ. शारदा गाडगे | सं.भा.प्र.स.ना. | २०१७ |
| ३८.बालकथातरङ्गिणी | डॉ.शारदा गाडगे | सं.भा.प्र.स.ना. | २०११ |
| ३९ बालनाट्यवल्लरी | दुर्गा पारखी | संस्कृतभारती | २०१३ |
| ४०.महाकवयः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ४१.महर्षिवर्याः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ४२.महाराष्ट्राचे ललित संस्कृत साहित्याला योगदान | डॉ.हंसश्री मराठे | श्री मंगेश प्रकाशन | २००६ |
| ४३.मुष्ट्यामेव अस्ति अमरत्वम् | डॉ.हेमा गोखले | मनोविकास प्रकाशन | २०१३ |
| ४४.मोहवनम् | डॉ. लीना रस्तोगी | | |
| ४५.योगिवर्याः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ४६.रम्या रामायणी कथा | कल्याणी काळे | संस्कृतभारती | २०१३ |
| ४७.रसरङ्गः | डॉ.लीना रस्तोगी | संस्कृतभारती | २०१३ |
| ४८.राजकीय महापुरुषाः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ४९.राजवर्याः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |

| | | | |
|---|---|---|---|
| ५०. रसाविष्कारः | प्रा.डॉ.विभा क्षीरसागर | क.का.सं.वि. | २०१६ |
| ५१. राधायनम् | सौ.ललिताशास्त्री आर्वीकर | श्री.आर्वीकर | २०१० |
| ५२. वणिग्वराः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ५३. विकसतु एषा कलिका | डॉ. लीना रस्तोगी | | |
| ५४. विदर्भाने संस्कृत साहित्यात घातलेली भर | डॉ.प्रभाकर आग्रे | श्री मंगेश प्रकाशन | २००३ |
| ५५. विशिष्ट महिलाः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ५६. शास्त्रवर्याः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ५७. शामस्यमाता | अनु.डॉ.मंजुषा कुळकर्णी | क.का.सं.वि. | २०११ |
| ५८. शारदीयम् | डॉ.सौ. शारदा गाडगे | श्री रेणुका प्रकाशन | २०१३ |
| ५९. शिक्षण महर्षयः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ६०. सत्पुरुषाः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ६१. संस्कृत साहित्यातील सुभाषितांचे चिकित्सक अध्ययन | डॉ.शारदा गाडगे | श्री मंगेश प्रकाशन | २००३ |
| ६२. संस्कृतगंगाधारा | सौ.आशा पांडे | सं.भा.प्र.स.ना. | २००९ |
| ६३. संस्कृत अन्त्याक्षरी मञ्जूषाक. | श्रीमती प्रभा घुले | क.का.सं.वि. | २०११ |
| ६४. संस्कृत-काव्य -तरङ्गिणी | सौ.आशा पांडे | निकेता प्रकाशल | २०१३ |
| ६५ संस्कृत बालनाट्यसंवाद मञ्जूषा | डॉ. वि.रा.जोशी | सं.भा.प्र.स.ना. | २०१३ |
| ६६. संस्कृत महाकाव्य - सृष्टीला महाराष्ट्राचे योगदान | डॉ.सौ.अबोली व्यास | श्री मंगेश प्रकाशन | २०१९ |
| ६७. स्वयंसिद्धः प्रज्ञाचक्षुः श्री गुलाबरावमहाराजः | डॉ.लीना रस्तोगी | संस्कृतभारती | २०११ |
| ६८. स्वातंत्र्यवीराः | संपादक मंडळ | क.का.सं.वि. | २००४-०५ |
| ६९. श्री गणेश वंदना | श्रीमती प्रभा घुले | श्री रेणुका प्रकाशन | २०१५ |



***